शारदाश्रम-पुरस्कृत-ग्रंथमाला पुष्प १५ वें

# प रा ग



कवि—

**नारायण नागोराव हूड,**

बी. ए. एल् एल्. बी. वकील.

पुरस्कार लेखक—

नामदार लोकनायक माधव श्रीहरि अणे,

एक्झिक्युटिव्ह-कौंसिलर ( सेंट्रल )

प्रस्तावना लेखक—

श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर

**यवतमाळ**

१९४१

किंमत दीड रुपया.

# अनुक्रमणिका

---

इंग्रजी विभागाची अनुक्रमणिका त्या विभागाच्या सुरवातीस पहावी.



# पुरस्कार

शारदाश्रमाचे एक सन्माननीय उत्साही व साहित्यसेवी कार्यवाह नारायणराव उर्फ बापूसाहेब हूड यांच्या मराठी इंग्रजी काव्यकृतींचा पहिला ग्रंथ शारदाश्रम पुरस्कृत ग्रंथमालेंतून प्रकाशित होत आहे, याबद्दल मला अतिशय आनंद वाटतो. या ग्रंथामुळें वरील मालेंत एका सुंदर ग्रंथाची भर पडली आहे; व त्यामुळें मालेविषयींची लोकप्रियता वृध्दिंगंत होण्यास साह्य होणार आहे.

बापूसाहेबांना काव्यरचनेचा नाद विद्यार्थि-दशेपासूनच आहे. विद्यार्थि-दशा संपवून वकीली व्यवसायांत पदार्पण केल्यानंतर ही त्यांची काव्यरचनेची हौस कमी न होतां सारखी वृध्दिंगत होत गेली, ही गोष्ट त्यांच्यांत असलेल्या कलेविषयींच्या उत्कट प्रेमाचें निःसंशय निदर्शक आहे. या संग्रहांत असलेल्या बहुतेक कविता वकीली-व्यवसाय सुरू असतांच लिहिलेल्या आहेत हें पाहिलें म्हणजे त्या

व्यवसायानें त्यांचे काव्यरचनेस ओहोटी न लागतां अधिकच भरती आली आहे, असेंच म्हणणें प्राप्त आहे. त्यांच्या काव्यप्रतिभेच्या संचार-क्षेत्रांत वकिलीचा व्यवसाय व त्यातील अनुभव हेही समाविष्ट झाले आहेत, हें या ग्रंथाच्या वाचकांचे लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

**भाषेंत कोमलता, रचनेंत कुशलता, भावनेंत उत्कटता, आणि कल्पनेंत नवीनता हे गुण बापूसाहेबांच्या कृतींत फार मोठ्या प्रमाणांत असलेले दृष्टीस पडतात. त्यांच्या या सुंदर काव्यसंग्रहांतील बहुतेक काव्यें आपल्या माधुरीनें रसिकांचे अंतःकरणास चटका लावतील!** गरीब, दीन, आणि दुबळे यांविषयींचा कनवाळुपणा, शेतकऱ्यांविषयींचा आपलेपणा, खेड्यांतील जीवनाविषयींचें प्रेम, स्वदेशाविषयींचा अभिमान, भक्तिप्रधान मनोवृत्ति, समतेकडे झुकणारा अंतःकरणाचा कल हे त्यांच्या स्वभावांत व जीवनांत दिसून येणारे गुण त्यांच्या काव्यांतून, ठिकठिकाणीं मोठ्या सरसतेनें प्रतीत झाले आहेत. याच दृष्टीनें, 'सृष्टिविलास', 'महाराष्ट्रास', 'नवलाचें पाखरूं', 'दत्ताजी शिंदे', 'आर्तनाद', 'हंगामानंतर', 'राखणी' इ. काव्यें वाचकांस नितांतमधुर वाट-तील. त्यांत वास्तविकता आणि ध्येयशीलता यांचें मधुरमीलन झालेलें त्यांच्या दृष्टीस पडेल. त्यांनीं स्वतःच 'काव्य–संन्यास' या आपल्या एकांकी उत्कृष्ट कृतींत सत्काव्याचें मोठें मार्मिक व उदात्त वर्णन केलें आहे.

चराचर होतां सुप्त
चैतन्य ती वितरीत
ज्ञानवल्ली हिजपुढें परेश लीन
निरुत्साही सृष्टिराणी
जीवकला तीतें आणी
वारंवार करुनियां वीणावादन

*  *  *

अल्पजीवी वस्तुजात
त्यास करिते शाश्वत
आयुष्यास गोडी आणी नित्य नूतन
भग्न जीवाला द्यायाला
विस्मृतीचा विरंगुळा
कलावती वांचोनीया कोणी न अन्य

बापूसाहेबांच्या या संग्रहांतील पद्यपरागांचे अवघ्राण करणाऱ्यांस कवितेच्या वरील पंक्तींत वर्णिलेल्या विस्मयोत्पादक विभूतिमत्वाचा थोडासा तरी प्रत्यय आल्यावांचून राहणार नाहीं, असा मला विश्वास वाटतो. काव्य-संन्यास या एकांकी नाट्यकाव्यांतील कवितास्तोत्र हें प्रसादिक कवींच्या उत्कृष्ट कृतींत गणले जाईल यांत संशय नाहीं.

ते प्रसिद्ध साहित्यसेवक व कवि वामनरावजी देशपांडे यांचे मित्र आहेत. व त्यांच्या प्रमाणेंच त्यांनाही मुक्तछंदांत रचना करतांना

बंधनविरहित मुक्ताप्रमाणें स्वैर संचार करण्यांत आनंद वाटतो. तथापि मुक्तछंद रचनेंत देखील त्यांनीं कांहीं नियम व नियंत्रण लावून घेतलें असल्यामुळें, त्यांच्या मुक्तछंदांतील कृतींतही प्रमाणबद्धता व तालबध्दता आली आहे. व काव्यकृतींच्या बाह्यवेषांतील हीं महावस्त्रें व्यवस्थेशीर व आटपशीर अंगावर घेऊन ती संचार करीत असल्यामुळें तिच्या स्वैर विलासांतही एक प्रकारचा प्रौढपणा दृग्गोचर होतो व तिजविषयीं वाचकांचे अंतःकरणांत आदर उत्पन्न होतो.

या संग्रहांतील एक सहज लक्षांत येण्यासारखें वैशिष्टय म्हणजे बापूसाहेबांच्या इंग्रजी भाषेंतील काव्यकृतींचा समावेश त्यांत केला आहे हें होय. एकाच ग्रंथकाराच्या संस्कृत–मराठी कवितेचें एकत्र प्रसिद्धीकरण झालेलें पाहण्यांत आहे. त्याच प्रमाणें प्राचीन कवींच्या हिंदी–मराठी कृतींचें एकत्र प्रसिद्धीकरण केलेले कांहीं ग्रंथ आहेत. परंतु इंग्रजी–मराठी काव्याचें एकत्र प्रसिद्धीकरण असलेला कदाचित् हाच पहिला महाराष्ट्रांत प्रकाशित झालेला ग्रंथ असावा असें मला वाटतें. इंग्रजींतून काव्य लिहिणारे हिंदी कवी बंगाल्यांत आहेत. एक दोन लेखक मद्रासेंतही आहेत. महाराष्ट्रांत श्रीमद्‌भगवत्‌गीतेचे निर्यमक पद्यमय इंग्रजी रूपांतर कै. वा. तैलंग यांनीं केलेलें–'सेक्रेड बुक्स् ऑफ् दी ईस्ट' या विश्वविख्यात ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेलें आहे. परंतु कै. वा. तैलंग यांनीं मराठी भाषेंतून कोणताही ग्रंथ लिहिल्याच मला तरी निदान माहित नाहीं.

नुकतेच दिवंगत झालेले माझे मित्र शंकर गजानन पुरोहित, जे अलीकडे चतुर्थाश्रम घेतल्यावर पुरोहित स्वामी या नांवाने विलायतेंत व हिंदुस्थानांत प्रसिध्द होते, त्यांनीं मराठींत ज्या प्रमाणें काव्य रचना केली तशीच इंग्रजींतही केली होती. त्यांच्या इंग्रजी कवितेची लेखीप्रत त्यांनीं हिंदुस्थानांतील पुष्कळ धनिक विद्वान आणि साहित्य सेवकांस दाखविली होती. कै. वा. हरि नारायण आपटे यांनीं त्यांच्या इंग्रजी काव्यकृतीची मुक्तकंठानें प्रशंसा केलेलें प्रशस्तिपत्रही मीं वाचलें होतें. विलायतेस जातांना कांहीं परप्रांतीय धनिक व रसिक गृहस्थांकडून कै. वा. पुरोहित स्वामी यांना जें द्रव्यसाह्य झालें तें त्यांच्या इंग्रजी कवितेच्या उत्कृष्टपणामुळेंच मुख्यतः मिळालें. विलायतेंत जगन्मान्य कवि Yeats यांच्याशीं त्यांचा जो दृढ परिचय झाला त्यालाही पहिलें कारण त्यांची इंग्रजी कविताच झाली. परंतु त्यांची ती कृति मुद्रित होऊन प्रसिद्ध झालेली माझे पाहण्यांत नाहीं. यीट्स बरोबर सहसंपादक होऊन दशोपनिषदांचें एक उत्कृष्ट इंग्रजी भाषांतर त्यांनीं प्रसिध्द केलेले विद्वान लोकांच्या अवलोकनांत आहेच.

तेव्हां बापूसाहेबांचा हा उपक्रम अत्यंत अभिनव व अभिनंदनीय असाच आहे. आमच्या महाराष्ट्रशारदोपवनांतील सुगंधित पुष्पें व स्वादु फळें जगांतील रसिकांचे समोर ठेवण्याचा हा नवा मार्ग त्यांनीं काढला याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत. शेवटीं त्यांनीं आपला ग्रंथ

शारदाश्रम पुरस्कृत ग्रंथमालेंतून प्रसिद्ध करून या मालेची लोकप्रियता वाढविण्यास साह्य केलें, याबद्दल आश्रमाचा अध्यक्ष या नात्यानें आश्रमातर्फे त्यांचे आभार मानून हा पुरस्कार लेख पुरा करतों.

**यवतमाळ**
श. १८६३ आषाढ शु. १५
**मंगळवार**
ता० ८—७—४१

**माधव श्रीहरि अणे**



# अवघ्राण



यवतमाळचे तरुण कायदेपंडित श्री. बापूसाहेब हूड यांनी आपल्या ' परागा ' चें, प्रकाशनापूर्वी, अवघ्राण करण्याचें आमन्त्रण मला दिलें, याबद्दल मी त्यांचा खरोखरीच फार आभारी आहे. कारण, त्यामुळें दहा वर्षांपूर्वी त्याच्याशी झालेली माझी ओझरती ओळख दृढ होण्याचा योग आला आणि ' पिंपळपाना ' त पाहिलेली त्यांच्या कवितेची गुलाबकळी पूर्णपणें उमललेली बघण्याचीहि आनन्ददायक संधि मला लाभली. पंधरा वर्षांपूर्वी श्री. हूड यांनी महाविदर्भांतील एक उदयोन्मुख कवि म्हणून आपल्या कोमल काव्य-वाणीने रसिकांचें चित्त आपल्याकडे आकर्षून घेतलें; व १९२६ सालीं पुण्याला प्रो. बापूसाहेब चापेकर यांच्या नेतृत्वाखालीं त्या वेळीं विद्यार्थि-दशेंत असलेल्या प्रो. यादवराव पाठक, श्री. व्यंकटेश वकील आणि श्री. अ. मु. पाठक या वैदर्भीय युवकांनी जें ' विहंगम-वृन्द ' नावाचें छोटेखानी मंडळ स्थापन केलें, त्याचेहि ते सदस्य होते. या ' वृन्दा'च्या सभासदांपैकीं प्रो. पाठक हे सहृदय कवि, ' विहंगमा'चे सम्पादक आणि नागपूरच्या ' वुअिमेन्स कॉलेज ' चे संस्थापक अशा निरनिराळ्या नात्यांनीं लोकांच्या पुढे आले; व श्री. व्यंकटेश वकील यांनी कवि, नाटिकाकार आणि वृत्त-विशारद अशा तिन्ही नात्यांनी चांगला लौकिक संपादन केला. यादवरावांचे बन्धु श्री. अमृतराव पाठक हे सरकारी नोकरींत शिरल्यामुळें व श्री. बापूसाहेब हूड हे वकिलीच्या व्यवसायांत मग्न झाल्यामुळें प्रो. पाठक किंवा श्री. वकील

यांच्याअितका वाङ्मयाशी त्यांचा संबंध आज साहाजिकच अुरलेला नाही. तरी सुद्धा बापूसाहेबांच्या कविता रत्नाकर, वागीश्वरी, विश्ववाणी, विहंगम, सह्याद्रि वगैरे नियतकालिकांतून मधून मधून प्रसिद्ध होत होत्या. आज पुढें असलेल्या या पुस्तकांत त्यांच्या कांहीं निवडक कवितांचा संग्रह केलेला आहे.

कायदेपांडित्य आणि कवित्वशक्ति यांच्यांत खरोखरी तसा विरोध नाही. खुद्द महाविदर्भांत कै. तात्यासाहेब कोल्हटकर, कै. अण्णाजी बोबडे प्रभृति कांही लेखक असे होऊन गेले कीं, ज्यांची बुद्धि काव्य आणि कायदा या दोहोंतही सारख्याच सुलभतेनें संचार करीत असे. कवितेची कोमलता कधी कायद्याच्या कोटिक्रमाला नडली नाही किंवा कायद्याची कर्कशता कधी कवितेच्या विलासाला भोंवली नाहीं. जयदेव कवीने काव्य आणि न्यायशास्त्र या दोन अगदीं भिन्न विषयांत लीलेने विहार करणाऱ्या कवींच्या प्रातिभेचें जें कौतुक केलें आहे तें याहि बाबतींत लागू पडतें, असें म्हणावयाला हरकत दिसत नाहीं. विद्यार्थि–दशेंत असतांना श्री. हूड यांनी शारदेजवळ अशी भिक्षा मागितली होती की—

अनन्त ही सृष्टि कवितेची जणू
अेक परमाणू याचीतसे
अफाट हा तुझ्या कवित्वाचा सिन्धु
अेकच मी बिन्दु इच्छीतसे
पुलिनीं तयाच्या काव्याचीच वाळू
होऊनी कृपाळू द्यावा कण.

त्यांनी मागितलेली ही भिक्षा शारदेने त्यांना अगदी भरल्या मुठीने वाढली

आहे, असेंच प्रस्तुत संग्रहातील कविता वाचताना रसिकांना वाटेल. इतकेंच नव्हे, तर त्यानी वकिलीच्या व्यवसायांतूनहि विनोद–प्रसंग उचलून ते आपल्या खोचदार वाणीनें कवितेंत ग्रथित केलेले आढळतील. ‘ पादत्राण व पोशारा ’ हें उपहासात्मक नाट्यकाव्य व ‘ युक्ति पण युक्ति ’ ‘ बा पक्षकारा ! ’ आणि ‘ एक दुःखपर्यवसायी कथा ’ या प्रस्तुत संग्रहातील कविता त्यांच्या उपरोधपटु बुद्धीने कायद्याच्या क्षेत्रांत हैरलेल्या उमेदवार वकिलांच्या दैन्याची साक्ष देतात. नाट्यकाव्यांतील उपहास हा बोचक असला, तरीहि तो वाचून हसूं येते. पण ‘ बा पक्षकारा ! ’ या कवितेतील वकिलाने

**हॅट तशी सूट नवे, बूट पहा करकरीत हे नामी,**
**हे केस जिंकण्याला येती काय न मुळींच रे कामी?**
**हंगामावर दे फी, ऑफिस कर पण जरा सुशोभीत**
**तुजवाचुनिया बैसे वकील कोटरिं जसा दिवाभीत**

ही पक्षकाराची भाकलेली करुणा मात्र हसूं आणण्याऐवजी मनांत कीव उत्पन्न केल्याशिवाय रहात नाहीं.

कायद्याची कर्कशता कवितेला बाधक होत नाहीं असें जें मी वर म्हटलें आहे, त्याचें उत्कृष्ट प्रत्यंतर प्रस्तुत काव्यसंग्रह वाचतांना येईल. किंबहुना, श्री. ‘ बी ’ यांच्यासारख्या वृद्ध कवीपासून तों श्री. पु. य. देशपांडे यांच्या सारख्या अलिकडील कादंबरीकारापर्यंत विदर्भांतील बहुतेक ललित लेखकामध्ये जी गूढगुंजनाची प्रवृत्ति कमी अधिक प्रमाणांत दृष्टीस पडते, तिचाहि आढळ श्री. हूड यांच्या कवितेंत झाल्याशिवाय राहत नाहीं. सारा दिवस कायद्याचा कीस काढून शिणलेली श्री. हूड

यांच्याअितका वाङ्मयाशी त्यांचा संबंध आज साहाजिकच अुरलेला नाही. तरी सुद्धा बापूसाहेबांच्या कविता रत्नाकर, वागीश्वरी, विश्ववाणी, विहंगम, सह्यादि वगैरे नियतकालिकांतून मधून मधून प्रसिद्ध होत होत्या. आज पुढें असलेल्या या पुस्तकांत त्यांच्या कांहीं निवडक कवितांचा संग्रह केलेला आहे.

कायदेपांडित्य आणि कवित्वशक्ति यांच्यांत खरोखरी तसा विरोध नाही. खुद्द महाविदर्भात कै. तात्यासाहेब कोल्हटकर, कै. अण्णाजी बोबडे प्रभृति कांही लेखक असे होऊन गेले कीं, ज्यांची बुद्धि काव्य आणि कायदा या दोहोंतही सारख्याच सुलभतेनें संचार करीत असे. कवितेची कोमलता कधी कायद्याच्या कोटिक्रमाला नडली नाही किंवा कायद्याची कर्कशता कधी कवितेच्या विलासाला भोंवली नाहीं. जयदेव कवीने काव्य आणि न्यायशास्त्र या दोन अगदीं भिन्न विषयांत लीलेने विहार करणाऱ्या कवींच्या प्रातिभेचें जें कौतुक केलें आहे तें याहि बाबतींत लागू पडतें, असें म्हणावयाला हरकत दिसत नाहीं. विद्यार्थि-दशेंत असतांना श्री. हूड यांनी शारदेजवळ अशी भिक्षा मागितली होती की—

अनन्त ही सृष्टि कवितेची जणू
अेक परमाणू याचीतसे
अफाट हा तुझ्या कवित्वाचा सिन्धु
अेकच मी बिन्दु इच्छीतसे
पुलिनीं तयाच्या काव्याचीच वाळू
होऊनी कृपाळू द्यावा कण.

त्यांनी मागितलेली ही भिक्षा शारदेने त्यांना अगदी भरल्या मुठीने वाढली

आहे, असेंच प्रस्तुत संग्रहांतील कविता वाचताना रसिकांना वाटेल. इतकेंच नव्हे, तर त्यांनी वकिलीच्या व्यवसायांतूनहि विनोद–प्रसंग उचलून ते आपल्या खोचदार वाणीने कवितेंत ग्रथित केलेले आढळतील. 'पादत्राण व पोबारा' हें उपहासात्मक नाट्यकाव्य व 'युक्ति पण युक्ति' 'बा पक्षकारा!' आणि 'एक दुःखपर्यवसायी कथा' या प्रस्तुत संग्रहांतील कविता त्यांच्या उपरोधपटु बुद्धीने कायद्याच्या क्षेत्रांत हेरलेल्या उमेदवार वकिलांच्या दैन्याची साक्ष देतात. नाट्यकाव्यांतील उपहास हा बोचक असला, तरीहि तो वाचून हसूं येते. पण 'बा पक्षकारा!' या कवितेतील वकिलाने

**हॅट तशी सूट नवे, बूट पहा करकरीत हे नामी,**
**हे केस जिंकण्याला येती काय न मुळींच रे कामी?**
**हंगामावर दे फी, ऑफिस कर पण जरा सुशोभीत**
**तुजवाचुनिया बैसे वकील कोटरिं जसा दिवाभीत**

ही पक्षकाराची भाकलेली करुणा मात्र हसूं आणण्याऐवजी मनांत कीव उत्पन्न केल्याशिवाय रहात नाहीं.

कायद्याची कर्कशता कवितेला बाधक होत नाहीं असें जें मी वर म्हटलें आहे, त्याचें उत्कृष्ट प्रत्यंतर प्रस्तुत काव्यसंग्रह वाचतांना येईल. किंबहुना, श्री. 'बी' यांच्यासारख्या वृद्ध कवीपासून तों श्री. पु. य. देशपांडे यांच्या सारख्या अलिकडील कादंबरीकारापर्यंत विदर्भांतील बहुतेक ललित लेखकामध्ये जी गूढगुंजनाची प्रवृत्ति कमी अधिक प्रमाणांत दृष्टीस पडते, तिचाहि आढळ श्री. हूड यांच्या कवितेंत झाल्याशिवाय राहत नाहीं. सारा दिवस कायद्याचा कीस काढून शिणलेली श्री. हूड

यांची बुद्धि सन्धि सापडतांच अन्तर्मुख होऊन, 'बी' कवीच्या 'वेडगाण्या'च्या धर्तीवर—

अलौकिक कांहीं तरी
सदा कदा मन हेरी
त्याच्यावीण चैन नसे-वेडी मी वेडी !!

अशा प्रकारचें गुंजन करीत 'विकल्पाच्या धुक्यां'त शिरावी याचें कोणाला नवल वाटणार नाहीं ? कदाचित् गूढगुंजन आणि काव्यलेखन ही त्यांच्या बुद्धीची विश्रांति, त्यांच्या 'मूकस्तवां'त विलीन होणाऱ्या जिवाचा विरंगुळा असावा. प्रस्तुत संग्रहातील सगळयांत हृदयंगम भावगीतें जर कोणतीं असतील, तर तीं भक्तीच्या आर्ततेने उचंबळून लिहिलेलीं. श्री. हूड यांच्या गूढगुंजनांत रमणाऱ्या भाविक मनाची प्रतिज्ञाच मुळीं ही आहे की—

चरण न दाविशी कां मानवाच्या स्वरूपांत
गोजिरें जें आवडीचे ज्यास नेत्र लोभतात.
ठाकसी न पुढे उभा जरि समोरासमोर
गोंधळला राहिन मी उभा येथें कल्पवर

'नको करूं अनुग्रह,' 'इशारा,' 'मूकस्तव,' 'सारंग' वगैरे कवितांतून ही भावोत्कटता निरनिराळया मनोज्ञ स्वरूपांत प्रगट झालेली दिसते.

लखलख निरांजन त्याच्यावरी लक्ष वाती
ओवाळिती भक्तगण मूर्तीवरी शेजारती
गाभाऱ्यांत नंदादीप धडधड जळताहे
रत्नखचित मुकुट तेजाळ तो शोभताहे
मूर्तीभोवती लोटली भाविकांची ही झिमड
रूप तिचें कोणालाही तींतुनी न दिसे धड

घणघण घंटा वाजे सिंहद्वारीं केव्हाची ही
परी परेश मूर्तीला यत्किंचित जाग नाही !

हे शेजारतीचें शद्वचित्र जितकें रंगदार आहे, त्याहिपेक्षा त्यांतील भावनेची सूचकता अधिक रम्य वाटते.

श्री. हूड यांच्या इतर स्फुट कविता सरस असल्या, तरी या भावगीतांच्या मानानें त्या एकंदरींत फिक्याच वाटतात. त्यांनी प्रणयपर ह्मणतां येतील अशा कविता थोड्याशा लिहिल्या आहेत. पण भक्तिपर गीतांतली उत्कटता कांहीं त्यांत नाही. अशा प्रकारच्या कवितांत 'तुझ्या सहवासीं' आणि 'अरर्धेच ठेव तव गीत' या दोन कविता हृदयंगम आहेत. 'जीवन ह्मणजे–' या कवितेंत उपरोधाच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेलें अन्तिम प्रणयमीलनाचें चित्र मजेदार वाटतें. त्या कवितेंतील–

तलम रेशमी त्रिकच्छ पातळ
बिनबाह्यांचा लांडा 'ब्लाउझ'
ओष्ठशलाका फिरविशी ओष्ठीं
शीतशर फासशी मुखाशीं
नेत्ररंजकहि दिसतें नेत्रीं
कुंतलसुधा केशास लावुनी
गुलाबजल शिंपिशी त्यावरी
आणि खोविशी कधि हौसेने
वेणीवरती 'गोल्डन ग्लीम'!

नाजुक छत्री डोईवरती
चामचंचिची करांत माळा
केसाळ पपी दुसऱ्या हातीं

यांची बुद्धि सन्धि सापडतांच अन्तर्मुख होऊन, ‘ बी ’ कवीच्या ‘ वेडगाण्या’च्या धर्तीवर—

अलौकिक कांहीं तरी
सदा कदा मन हेरी
त्याच्याविण चैन नसे-वेडी मी वेडी !!

अशा प्रकारचें गुंजन करीत ‘ विकल्पाच्या धुक्यां ’त शिरावी याचें कोणाला नवल वाटणार नाहीं ? कदाचित् गूढगुंजन आणि काव्यलेखन ही त्यांच्या बुद्धीची विश्राति, त्यांच्या ‘ मूकस्तवा ’त विलीन होणाऱ्या जिवाचा विरंगुळा असावा. प्रस्तुत संग्रहातील सगळ्यांत हृदयंगम भावगीतें जर कोणतीं असतील, तर तीं भक्तीच्या आर्ततेने उचंबळून लिहिलेलीं. श्री. हूड यांच्या गूढगुंजनांत रमणाऱ्या भाविक मनाची प्रतिज्ञाच मुळीं ही आहे की—

चरण न दाविशी कां मानवाच्या स्वरूपांत
गोजिरें जें आवडीचे ज्यास नेत्र लोभतात.
ठाकसी न पुढे उभा जरि समोरासमोर
गोंधळला राहिन मी उभा येथें कल्पवर

‘ नको करूं अनुग्रह, ’ ‘ इशारा, ’ ‘ मूकस्तव, ’ ‘ सारंग ’ वगैरे कवितांतून ही भावोत्कटता निरनिराळ्या मनोज्ञ स्वरूपांत प्रगट झालेली दिसते.

लखलख निरांजन त्याच्यावरी लक्ष वाती
ओवाळिती भक्तगण मूर्तीवरी शेजारती
गाभाऱ्यांत नंदादीप धडधड जळताहे
रत्नखचित मुकुट तेजाळ तेंं शोभताहे
मूर्तीभोवती लोटली भाविकांची ही झिमड
रूप तिचें कोणालाही तींतुनी न दिसे धड

घणघण घंटा वाजे सिंहद्वारीं केव्हाची ही
परी परेश मूर्तीला यत्किंचित जाग नाही !

हे शेजारतीचें शद्बचित्र जितकें रंगदार आहे, त्याहिपेक्षा त्यांतील भावनेची सूचकता अधिक रम्य वाटते.

श्री. हूड यांच्या इतर स्फुट कविता सरस असल्या, तरी या भावगीतांच्या मानानें त्या एकंदरींत फिक्याच वाटतात. त्यांनी प्रणयपर ह्मणतां येतील अशा कविता थोड्याशा लिहिल्या आहेत. पण भक्तिपर गीतांतली उत्कटता कांहीं त्यांत नाही. अशा प्रकारच्या कवितांत 'तुझ्या सहवासीं' आणि 'अरधेंच ठेव तव गीत' या दोन कविता हृदयंगम आहेत. 'जीवन ह्मणजे–' या कवितेंत उपरोधाच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेलें अन्तिम प्रणयमीलनाचें चित्र मजेदार वाटतें. त्या कवितेंतील–

तलम रेशमी त्रिकच्छ पातळ
बिनबाह्यांचा लांडा 'ब्लाउझ'
ओष्ठशलाका फिरविशी ओष्ठीं
शांतशर फासशी मुखाशीं
नेत्ररंजकहि दिसतें नेत्रीं
कुंतलसुधा केशास लावुनी
गुलाबजल शिंपिशी त्यावरी
आणि खोविशी कधि हौसेने
वेणीवरती 'गोल्डन ग्लीम'!

नाजुक छत्री डोईवरती
चामचंचिची करांत माळा
केसाळ पपी दुसऱ्या हातीं

अंवखळपणा तर अंगोपांगीं
स्वभाव वाटे फटाक्यांतली
काय तडतडी !

हें आधुनिक युवतीचें वर्णनहि मोठें अपरूप आहे. याच सदरांत मोडण्या-सारख्या दुसऱ्या कविता ह्मणजे कुणबाऊ भाषेंत लिहिलेलीं जानपद गीतें. सुशिक्षित कवींनी आपल्या आधुनिक प्रणयभावनांचा आरोप निरक्षर नांगऱ्यांवर करून लिहिलेल्या अलिकडील नकली लावण्या मला फारशा आवडत नाहींत. कारण त्यांतील भावनेच्या कृत्रिमतेमुळें लावणी आणि जानपद जीवन या दोहोंचेंहि खरोखरी विडंबन होतें. प्रस्तुत संग्रहांतील या जानपद गीतापैकी ' नवलाचें पाखरू ' आणि ' दिल्भरा ' या दोन लावण्या मात्र छान आहेत. कारण, या लावण्याची भाषा जरी थोडी ग्रामीण असली, तरी जानपद वातावरण त्यात आणलेलें नाही; व त्यांतील लावणीचा घाट आणि थाट हीं दोन्हीहि अस्सल भासतात. ' दिल्भरा ' मधील ही विरहातुरता किती भेदक आहे पहा—

लावण्यकळा मुसमुसे, चैन मज नसे, उदासच दिसे
राञ अंधारि , राञ अंधारी
नेत्रास नेत्रही लागातिना पळभरी
वेणींत खोवुनी दवणा, लावुनी नयना तुजकडे रमणा
पाहतें वाट, पाहतें वाट
काहूर मनामाधि उठलें पारि घनदाट !
उमदा तूं दिससी बन्सि, तुझी मी हांसि, नार गुलबासी
होउं दे मिळणी, होउं दे मिळणी
हो मयंक मीही होइन तव चंद्राणी !!

अर्वाचीन कवींनी लिहिलेल्या उत्तम लावण्यांत श्री. हूड यांच्या या लावणीची गणना होईल, असें मला वाटतें.

प्रस्तुत संग्रहांत श्री. हूड यांच्या प्रदीर्घ रचनाकौशल्याची साक्ष देणारे असे ‘ फासेपारध ’ या खंडकाव्यांतले तीन उतारे दिलेले असून ते तिन्ही चांगले आहेत. पण, रचना आणि विषय या दोहोंचेंहि मनोहर असें नावीन्य जर त्यांच्या कोणत्या प्रदीर्घ कृतींत दृष्टीस पडत असेल, तर तें ‘ काव्य–संन्यास ’ या एकांकी नाट्यकाव्यांत. मराठींत नाट्यगीतें बरींच असलीं, तरी ब्राउनिंगच्या छोट्या नाट्यकाव्यांसारखीं नाट्यकाव्यें लिहिण्याचा प्रयत्न मात्र फारसा कुणी केलेला माझ्या तरी पाहण्यांत नाही. श्री. वामनराव देशपांडे यांच्या ‘ कपटवेष ’ या सुंदर नाट्यकाव्याकडे केवळ एक अपवाद म्हणूनच बोट दाखवावें लागेल. ‘ कपटवेषा ’ प्रमाणेच श्री. हूड यांचें ‘ काव्यसंन्यास ’ हें नाट्यकाव्यहि भाषा, रचना आणि विषय या तिन्ही बाबतींत अभिजात आहे. बृहत्‌-कथेचा कर्ता गुणाढ्यकवि याच्या काव्य–दहनाची रोमांचकारी कथा कोणाला माहित नाही ? श्री. हूड यांनीं या कथेवर हें हृदयस्पर्शी नाट्यकाव्य लिहिलेलें असून, त्यातील निरनिराळ्या दृश्यांचें रेखन आणि रसपरिपोष हीं दोन्ही उत्कृष्ट साधलेलीं आहेत. या काव्यांत मला उपमेची फक्त एकच चूक आढळली. गुणाढ्य जेव्हां सातवाहनाच्या राज-सभेंत प्रवेश करतो, तेव्हां मार्गणाने त्या प्रसंगाचें असें वर्णन केलें आहे की—

वर्दी देई जसा सूर्यागमनाची
लुब्धक तारक
वीणादास शोभे पुरोगामी तसा
मागून शोभतो विश्वकवि थोर

कृशमूर्ति जरी तपस्येचें तेज
रत्नकीळेसम फाके देहावरी !

मला वाटतें, सूर्योगमनाची वर्दी ' लुब्धक ' म्हणजे व्याधाचा तारा कधी देत नाही, शुक्राचा तारा देतो. एवढी एक नजर-चूक सोडल्यास या नाट्यकाव्यांतील बहुतेक उपमा अगदी नवीन असून, त्यामुळें त्यांतील वर्णनाला ओजस्वितेबरोबरच सौंदर्यहि आलें आहे. गुणाढ्यानें केलेलें--

आकाशवेलीचें भूमीवरी मूळ
कसें उगवेल ? कसें वा तगेल ?
कविता-किशोरी हीही नच तशी
मर्त्य लोकांतील
शापित ही कुणी यक्षकन्यकाच
अवतरतसे इथे अवचित
नगरींत वत्से ! म्हणुनिया जाई
आपुल्या अद्भुत !

हें स्वतःच्या कवितेचें वर्णन जितकें रम्य आहे, तितकेंच ' कवीःकवीनाम् ' असा जो जगदीश त्याच्या विश्वकाव्याचें त्याने केलेलें--

तत्वद्रष्टा कोण बरें प्रतिभावंत कवीश ?
हुकमत साऱ्या रसांवरी एकच तो जगदीश
काव्य तयाचें हें असें मूर्तिमंत ब्रम्हांड
त्यामधलें हें जग अपुलें म्हणजे ' सुंदरकांड ! '

हें वर्णनहि रमणीय वाटतें. या नाट्यकाव्यांतील संवाद मार्मिक आणि ओजस्वी असून, गुणाढ्याचें स्वभावरेखन धीरोदात्त आहे.

**श्री. हूड यांना चिरन्तन 'कवियशा' ची प्राप्ति करून द्यावयाला एवढी एकच काव्यकृति पुरे होईल, असें जर मीं म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होणार नाही.**

प्रस्तुत पुस्तकांत श्री. हूड यांच्या मराठी कवितांप्रमाणेंच त्यांच्या इंग्रजी कवितांचाहि संग्रह केलेला आहे; व तो पाहून वाचकांना प्रथमदर्शनीं तरी अचंबा वाटल्याविना राहणार नाहीं. कारण, महाराष्ट्रांत इंग्रजी भाषेंतून लेखन करण्याची प्रवृत्ति इतकी कमी आहे की, श्री. हूड यांच्या या इंग्रजी कविता पाहून आपण कांहीं तरी अजब चीज बघत आहोंत, असेंच खरोखरी रसिकांना वाटेल. तरुलता दत्त, रमेशचंद्र दत्त, रवीन्द्रनाथ टागोर, अरविंद घोष, सरोजिनी नायडू, हरीन्द्रनाथ चट्टोपाध्याय प्रभृति इंग्रजींतून काव्यरचना करून युरोपियन कीर्ति संपादन केलेले कवि बंगाल मध्ये अनेक झाले आहेत. पण, परभाषेच्या जोरावर आक्रमण करतां येण्यासारख्या दिगन्त कीर्तीच्या या क्षेत्रांत आपण पाऊल टाकण्याचें धाडस करावें, अशी कल्पनाहि कधी आधुनिक मराठी कवींच्या मनांत आलेली दिसत नाही. रे. टिळक यांच्या कांही कवितांचीं इंग्रजी भाषांतरें अमेरिकन मिशनरींनी केलेलीं प्रसिद्ध आहेत; व मुंबईचे साम्यवादी पुढारी श्री० श्री. अ. डांगे यांनीं ते वीस वर्षांपूर्वी विद्यार्थि-दशेंत असतांना गोविंदा-ग्रजांच्या कांही कवितांचीं इंग्रजी रूपांतरें 'यंग कॉलेजिएट' या मासि-कांतून प्रकाशित केलीं होतीं. पण हे अनुवादाचे प्रयत्न स्वतः कवींनी केलेले नाहींत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. नाही म्हणावयाला कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांनी मात्र आपल्या दोन तीन इंग्रजी कवितांचीं भाषांतरें स्वतःच करून तीं वीस वर्षांपूर्वी मला वाचून दाखविलीं होतीं. त्या दृष्टीने श्री. हूड यांचें हें इंग्रजी काव्य-लेखनाचें साहस मला अभिनन्दनीय वाटतें; व त्यांतील रचनेची सफाई आणि कल्पकतेची चमक निःसंशय कौतुकास्पद आहे. तथापि त्यांच्या या इंग्रजी काव्य-लेखनाचा महाराष्ट्रांत जरी

कदाचित् गौरव झाला, तरी तें त्यांना इंग्रजी वाङ्मयांत स्थान किंवा यश मिळवून देईल, असें मात्र मला वाटत नाही. जिथे डॉ. टागोर किंवा सौ. सरोजिनी नायडू यांच्या कवितेलाहि आपल्या वाङ्मयांत स्थान देण्याची इंग्रजांची तयारी नाही, किंबहुना अमेरिकन इंग्रजीलाहि 'यॅंकी इंग्लिश' म्हणून जे तुच्छतेनें नाकें मुरडतात, त्यांच्याकडून आपल्या कवितेचें कौतुक यदाकदाचित् झालेंच तर तें A clever machine made imitator of the English classics ( इंग्रजी अभिजात काव्यकृतींची यांत्रिक नक्कल करणारा हुषार अनुकर ) या भारदस्त अभिप्रायानेंच होईल, हें श्री. हूड यांनी ध्यानांत ठेवावें. मात्र इंग्रजींतून लेखन करण्याच्या त्यांच्या या हौसेचा एक फायदा मराठी भाषेला मिळण्यासारखा आहे. तो असा कीं, मराठींतील गद्यपद्य वाङ्मयाचे इंग्रजी अनुवाद किंवा त्यावरील इंग्रजी टीकाप्रबन्ध जर त्यांनी प्रसिद्ध केले, तर त्यांचें मात्र इंग्लंडांतील रसिकांकडून चांगलें स्वागत होईल; व एक महत्वाचें देशकार्य केल्याचेंहि श्रेय श्री. हूड यांना मिळेल. 'पऱ्यांची नगरी' आणि 'पऱ्यांचे गाणें' या श्री. वामनराव देशपांडे यांच्या कवितांची त्यांनी केलेली सरस इंग्रजी रूपान्तरें या दृष्टीनें वाखाणण्यासारखीं आहेत.

असो. अवघ्राण म्हणजे परीक्षण नव्हे किंवा विस्तृत रसग्रहणहि नव्हे. श्री. हूड यांच्या कवितांचा आणि काव्यगुणांचा जो ओझरता उल्लेख मी वर केला आहे, त्याशिवाय कितीतरी जास्त आणि कदाचित् निराळे असेहि गुण रसिकांना या 'परागांचें रसग्रहण करतांना आढळतील. श्री. हूड हे नुसते कवि नाहीत; तर जुन्या वाङ्मयाचे आणि संस्कृतीचे मुरब्बी अभ्यासक आणि संशोधकहि आहेत. त्यामुळे अनेक जुन्या शब्दांचा आणि संकेतांचा मार्मिक उपयोग त्यांनी आपल्या कवितांतून

केलेला दृष्टीस पडतो; व त्यांच्या सुश्लिष्ट रचनेंत भाषेचा एक नवाच थाट केव्हा केव्हा अनुभवाला येतो. त्यांच्या उपमा या निरीक्षण आणि मनन यांतून स्फुरलेल्या असून, रचनेप्रमाणेच त्यांतहि एक प्रकारचें नावीन्य प्रतीत होतें. महाविदर्भ हा प्राचीन काळापासून आपल्या विशिष्ट 'रीति' बद्दल प्रसिद्ध आहे; व आजही या प्रांतांतील अनेक कवींनी आणि लेखकांनी आपल्या विशिष्ट शैलीने ती त्याची कीर्ति वृद्धिंगत केली आहे. 'काव्यसंन्यासा' मध्ये वीणादास म्हणतो—

कलेचाही कसे बाजार मांडिती
पहा जडमती !
अव्यभिचारिणी उपासनेवीण
निर्माण होती कां कुठे काव्य-लेणीं ?
काव्य-कलावती अभिराम याची
नच साधारण
नवरस येथे करा जोडोनिया
पूजनार्थ सिद्ध ब्रह्मकुमरीच्या

या वर्णनाला शोभेल असेंच त्यांच्या स्वतःच्याहि कवितेचे अभिराम आणि अभिजात स्वरूप आहे, एवढेंच शेवटीं म्हणून मी हे 'पराग' रसिकांच्या हातीं देतों.

शांतानिवास, नागपूर शहर
ता० २१-६-४१

ग. त्र्यं. माडखोलकर

# फलश्रुति



महाराष्ट्र रसिकांसमोर इतक्या काळानंतर आज माझ्या कांहीं कवितांचा संग्रह ठेवण्याचा आनंददायक प्रसंग येत आहे, याबद्दल मला समाधान वाटतें !

संग्रह प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत मला अनेक सद्गृहस्थांचें साह्य झालें आहे.

फर्ग्युसन कॉलेजमधील इंग्रजीचे प्रोफेसर गुरुवर्य भा. म. गोरे यांनीं माझ्या इंग्रजी कविता आपुलकीनें तपासल्या व त्यांत आवश्यक सुधारणा केल्या; इतकेंच नव्हें तर इंग्रजी विभागाला 'फोरवर्ड' ही लिहिला. 'Departure' या 'सॉनेट' ची कल्पना माझी असली, तरी त्याची रचना थोडीशी शिथिल असल्यामुळें, श्री० गोरे यांनीं पूर्वीच्या रचनेंत फरक करून तें संपूर्णतया रचलें. श्री० गोरे यांच्या ऋणांतून मुक्त होणें मला खरोखरीच कठिण आहे !

शारदाश्रमाचे दुसरे कार्यवाह श्री० रा. द. दामले वकील यांनीं पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील चित्र माझ्या 'फुलवेडी' या कवितेतील कल्पनेबरहुकूम वठविलें. त्यांचा मुख्य व्यवसाय चित्रकाराचा नसूनही त्यांनीं दाखविलेलें चित्रकलेंतील कौशल्य त्यांना भूषणावह आहे. त्यांचा मी आभारी आहे.

त्याचप्रमाणें प्रो० भ. रा. देशपांडे यांनीं 'इंपोर्ट' लिहून दिला; श्री. वा. ना. देशपांडे यांनीं आपल्या कवितांची इंग्रजी रूपांतरें करण्यास परवानगी दिली; श्री० य. खु. देशपांडे यांनीं वेळोवेळी जरूर ती मदत केली; प्रो० या. मु. पाठक. व श्री० पां. श्रा. गोरे यांनीं महत्वाच्या सूचना केल्या; श्री० कृष्णराव देशपांडे वकील यांनीं सोमेश्वर प्रेसच्या मालकाची ओळख करून देऊन छपाईचें कार्य सुलभ केलें; श्री०आबासाहेब जोशी यांनीं मुद्रणाचें काम आस्थापूर्वक व आकर्षक करून दिलें; श्री० शंकरराव गोडबोले

वकील यांनीं प्रुफें तपासण्यांत व शुद्धिपत्र करून देण्यांत भाग घेतला. श्री० राजाभाऊ शेषराव देशपांडे यांनीं सुरवातीपासून पुस्तकाबाबत सर्व प्रकारचें काम निरलसपणें केलें. या सर्व सद्गृहस्थांचे मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

प्रथितयश साहित्यिक श्री. वि. स. खांडेकर व प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनीं पुस्तकावर अभिप्राय पाठविले याबद्दल त्यांचेही आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

नामदार लोकनायक अणे यांच्यासारख्या थोर विद्वद्वर्यांचा पुरस्कार माझ्या पुस्तकाला लाभला, हें मी मोठें भाग्य समजतों. महाराष्ट्रांतील बिनीचे साहित्यटीकाकार श्री० ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं माझ्या पुस्तकाला सुंदर प्रस्तावना लिहून माझ्यावर ऋणाचें ओझें करून ठेवलेलें आहे. त्यांचे आभार मानावयास मजजवळ पुरेसे शब्द नाहींत; त्यामुळें त्यांच्या ऋणांतच राहण्याचें ठरवितों. या संग्रहांत इंग्रजी कविता नमुन्यादाखल घेतलेल्या आहेत. इंग्रजी भाषा ही जाणूनबुजून परकीय असल्यामुळें या कवितांत कांहीं दोष राहून गेले असतील; तरी रसिक टीकाकार त्यांविषयीं सौम्योदार दृष्टि ठेवतील अशी आशा आहे.

'पाचोळा' ही कविता प्रसिद्ध कवि कुसुमाग्रज यांच्या एका कवितेवरून सुचल्याचें स्मरतें.

'पांखवा' 'अंबरपट' 'वेडप्या, मधुकरा!' 'घालुं नकोस आतां अटी' 'तळतळाट!' 'बहार!' 'अकारण' 'तुणतुणें!' या कविता श्री० माडखोलकर यांची प्रस्तावना व लोकनायक अणे यांचा पुरस्कार मिळाल्यानंतर लिहिल्या गेल्यामुळें त्यांच्या अवलोकनांत आल्या नाहींत.

महाराष्ट्रांतील जेष्ठ श्रेष्ठ साहित्यिकांनीं माझ्या कृतीचें कौतुक केलें, त्यामुळें मला माझ्या श्रमाचें चीज झाल्यासारखें वाटतें. बृहन्महाराष्ट्रांतील रसिक वर्गालाही माझी ही अल्पसेवा आवडेल असा मला भरंवसा आहे!

यवतमाळ.
ता. २।८।४१

नारायण नागोराव हूड.

# हविर्भाग



[ जातिः मुद्रिका ]

रसिकते ! तुझी धाकुटी बहिण शारदा
पाहण्यास कौतुक तीचें सत्वर तव वळवी पदां ! १

तूं दुर्मिळ भूमीवरी श्रेयवर्धिनी
तें कळे न वससी कोठें तरि महोच्च सिंहासनीं ! २

यक्षिणी सूक्ष्म खेळती फुलांच्यावरी
तव विलास-लीला चाले सत्काव्य-प रा गां वरी ३

तुजविणें न होई कधीं काव्य-सांगता
मान्यता न तुजविण त्यातें ती तशीच वा धन्यता ४

हर्षपूर दाटे आज माझिया मनीं
तो व्यक्त कराया भाषा तोकडी पडे शोभिनी ! ५

पूजेची झाली अतां देवि ! सिद्धता
ये हविर्भाग घ्यायाला सोडुनी सर्व रुष्टता ! ६



# प रा ग

## फुलवेडी !

[ चाल : स्त्रीगीताची ]

फुलवेडी ' ह्मणती ग ! मज फुलवेडी ! ॥ ध्रु० ॥

संसारांत न आराम

माझा भलताच राम !

भोग-विलासांत नसे मजला गोडी १

दिव्य तारकांच्या संगे

मानस ग ! मम रंगे

त्यांच्यामध्यें रमण्याची मज आवडी २

पुष्पांमधील सौंदर्य

त्यांत लागे माझा लय

त्याच्यासवे खेळत्यें मी झिम्मा-फुगडी ! ३

कल्पनेच्या हिंदोळयांत

झोके घेत्ये दीनरात

ह्मणतो ग ! जन मला ' खुळी भाबडी ! ' ४

प्रतिभेच्या पंखावरी

विहरत्ये दूरवरी

पार्थीवाची एकदाची झाली ' फू गडी ' ५

चाकोरींत या ठरीव

समाधान नसे लव

क्षुद्र बंधनांची तोडी ह्मणून बेडी ६

शेणकाव्या करीत ते--
जन गोळा जे जाणते ( ? )
लक्ष नक्षत्रांच्या वरी, त्यांना मी जोडी ७
अलौकीक कांहींतरी
सदाकदा मन हेरी
त्याच्याविण चैन नसे--वेडी मी वेडी !!! ८

---

## इच्छा

—0—

[ जाति : नीराजन ]

सोलीपर्णावाणी तुझा रंग मोहक सोनेरी
जीव करी वेडापीसा पाडि भुरळ अंतरीं ! १
मधुरसा-पर्णे जशी गोड तसे गूण तुझे
नागबलेचें आरुणी फूल गालीं खुले ताजे ! २
केशसंभार मृदुल सुगंधीत जसा मुरा
किंवा रेशमी भासतो मक्याचाच जणू तुरा !! ३
वस्त्रालागी वाली मीठी जशि झिंजीरीटा कांहीं
तशि-तशीच खेव तूं देशि माझ्या देहालाही ! ४
पिंडितगरीं वसतो गोड जसा मकरंद
तुझ्या हृदयीं प्रणय वसुनीयां करी धुंद ५
भुइदोडी-जोडफळ तसें आपुलें मीलन
होवो कल्पवरी हेंची इच्छितसे माझें मन !! ६

---

सोली, मधुरसा, नागबला, झिझीरीटा, पिंडितगर, भुइदोडी, इ० सुंदर लता.
मुराः—लांबसडक काळसर अंस सुगंधी तृणांकुर.

# पाहिजेत ! पण कोण ?

—0—

[ जाति : उद्धव ]

पाहिजेत वीर बिनीचे
चैतन्य आज देणारे ! १
कोसळे राष्ट्र-घर खाली
त्याला वर सावरणारे २
राष्ट्राची कलती नौका
पैलपार उतरविणारे ३
धर्मास्तव देशास्तव वा
असतिल कीं जे मरणारे ! ! ४
अन्याय करिल जो त्याचे
क्षणिं मनगट ते धरणारे ५
दीनांचे वा दुबळ्यांचे
अश्रूहि करीं पुसणारे ६
बोलतां येत जे नाहीं
छातिठोक तें वदणारे ! ! ७
कधिं प्रसंग पडतां बाका
निःशंक पुढें सरणारे ८
वाघाच्या तोंडी हात
घालाया जे धजणारे ! ९
पाहिजेत वीर बिनीचे
चैतन्य आज देणारे ! ! ! १०

# दिव्य किमया !

—o—

[ जाति : अभिसारिका ]

लोपली वीणेची झंकृति
पहुडली धूळ खात संप्रति
काजळी तुझ्यावर चढे किती वसुमती ! १

रुसली कविता-बालाहि कां ?
जाहला कंठ तिचा कां मुका ?
तो नूर पूर्विचा गोड असा कां फिका ? २

जीर्णता फुलाफुलांच्यावरी
ओघळे त्यांची मधुमाधुरी
तीं माना टाकुनि तळमळती अंतरीं ३

भृंगतति थांबविती गुंजन
कसें मग पुष्पांशीं मीलन ?
थांबलें जगतिचें प्रणयाचें कूजन ४

वायुही कोपऱ्यांत जाउनी
बैसला खिन्न होउनी मनीं
मग गंध फुलांचा पसरावा जागिं कुणी ? ५

अहह ! हा उजाड झाला मळा
देखतां येई दाटुन गळा
ही भीषण येथें फैलावे अवकळा ६

अचेतन विश्व कसें जाहलं
एकही पान कुठें ना हलें
अडखळली आतां ‘ प्रगती ’ ची पाउलें !! ७

* * *

अंगीं चैतन्याची द्युति
देहीं साधेपणही किती
ही कोण चालली येथुन ग्रामिण युवती ? ८

काय पण दिव्य हिची ही कांती
कोयता खेळे एका हातीं
अवजारें दुसऱ्या करीं कितीतरि दिसती ९

फेंकुनी टपोर चंचल दृष्टि—
चहुंकडे झाली भारी कष्टी
पण नंतर केली मंदहास्यमधुवृष्टी !! १०

* * *

किमया दिव्य तोंच जाहली
विस्मयें दृष्टी विस्फारली
ही मनोज्ञ शोभा क्षणीं कशी विस्तरली ? ११

— गायकें वीणा उचलुनि क्षणीं
करांगुलि फिरविलि तीवर क्षणीं
ध्वनिजाल गुंफण्या लागे ती त्रिभुवनीं ! १२

भृंगही खडबडुनी धावतो
फुलांवर रुंजी क्षणिं घालतो
मग ‘ आश्लेषां ’ ना आली ‘ भलती ’ भरती !! १३

सुवासें मत्त फुलें जाहली
खेळती वायूच्या आंदोलीं
मग स्वैर चुंबुनी त्यांना तो करि केली ! १४
हांसली आतां कविता-कला
निघाला माळांतुन मधु मळा
मरुदेश क्षणांतरिं उद्यानच जाहला !!! १५

---

# पादत्राण व पोबारा*

— 0 —

[ उपहासात्मक नाट्यकाव्य ]

[ अनुष्टुभ् ]

**वकील:—** पैसे आणियिले सांग किती आज तुवा परी ?
' फी ' वांचोनिया कार्या नसे उत्साह अंतरीं
आधी सांग खिशामाजी पैसा खेळत वा न वा ?

**पक्षकार:—** ( मनांत ) खिशावरी असे लक्ष कामाची परि वानवा !!
( उघड ) भावाच्या जवळी कसनी गेली मागेच राहुनी
पैशाचें काय, केव्हांही पैसा येईल चालुनी !!
' कोर्ट ' खर्च करा तुह्मी पुढें मागे बघूं नका
जिंकल्यावरती ' केस ' वाटा देईन थोडका !

**वकील:—** ( त्याचे रागाचा पारा चढलेला दिसतो. )
मारायची असे चाट काय रे, मज त्वन्मनीं ?
वकीलच परी मीही हात देईन दाउनी !!

---

* एक सत्यकथा

पक्षकारः— तीन मी रुपये आणी (पक्षकार वदे असे
चर्येवरी वकीलाच्या प्रमोद नटला दिसे)

वकीलः— काढ काढ खिशांतूनी (झाली उत्सुक तन्मती)
आतांच जाउं दे अर्ज 'दीर्घसूत्री विनश्यति!'

पक्षकारः— ऐका तर जरा माझें बोलू द्या मजला तरी

वकीलः— पैसे काढ; पुरे आतां तुझी चर्पटपंजरी!!!

पक्षकार— दिधला मोटार-भाड्याला रुपया कालच एक मी
होणार कधीं भाडें मोटारीचें तरी कमी ?

वकीलः—(त्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष्य करीत— )
बरें बॉ!! आण ते दोन अर्जाला वेळ होतसे

पक्षकारः— ऐकाना पुढती, तुह्मा पैशाचें लागलें पिसें
हॉटेलांत जिरे एक अहो! टिकली तयांतली
हिशेब शहरीं नसतो करायाचा बघा मुळीं!

वकीलः—(तोंड आंबट करीत— )
काढ एक तरी आतां उरला तोच लौकर
(हात त्यानें पुढें केला होउनी अति आतुर.)

पक्षकारः— दोस्ताला उसना तोही आतांच दिधला परी
ह्मणावे काय लेकांना अवेळीं बसती उरीं!?

* * *

पादत्राण वकीलानें आपुलें काढलें क्षणीं
पोबारा पक्षकारानें केला वेगांत तत्क्षणी!!!

---

# विकल्पाचें धुकें *

—0—

[ जाति : कैवल्य ]

[ सुनीत ]

१

मननाच्या वारूवर क्षण आरूढ होऊन
भक्तिमार्गी भ्रमलों मी जग पार्थिव सोडून
अंतःचक्षूंनीं देखील्या प्रचितिच्या खुणा कांहीं
परि माग नच लागे तुझा दयाळा ! कोठेंही
अस्थिरशा वाळूवरी तुझें मंदिर तें नामी
उंबरठ्यापर्यंतच कसाबसा ठेपलों मी !!
मूर्ति दडलेली खोल राउळाच्या गाभाऱ्यांत
विकल्पाचें धुकें तेव्हां उठे माझ्या अंतरांत !

२

तुझ्या अस्तित्वाविषयीं साशंकच झालें मन
क्षीण भाव झाला माझा तदा आणखिच क्षीण !!
चरण न दाविशी कां मानवाच्या स्वरूपांत ?
गोजिरें जें आवडीचें ज्यास नेत्र लोभतात !
ठाकिशी न पुढें उभा जरि समोरासमोर
गोंधळला राहिन मी उभा येथें कल्पवर !!

---

* या कवितेचें इंग्रजी रूपांतर इंग्रजी विभागांत पहावें.

# कळीचा नारद

—0—

( प्रत्येक खेडेगावांत असा एकादा तरी नमुना सापडेलच ! )

( " फांसेपारध ! " या खंडकाव्यांतून )

[ चाल : गर्द सभोंती रान साजणी — ]

— केसोतात्या दिसून येई साळसूद किति नर
नर तो कसचा ? कीलोत्पाटी होता कुणि वानर ! !
डोईवरती संजाबाचा चक्कर मोठा दिसे
टक्कल पडलें पुढें जरासें — भाग्यचिन्ह कां नसें ?
बांधा ठेंगू, मांसल वेरहि पोटाचा जब्बर
माजुन राही रंग तेलिया साऱ्या देहावर !
रुद्राक्षांच्या गळ्यात माळा, कडक अती सोवळें
'कर्तुमकर्तुम' परेशाही कां उगाच ऐसा वळे ?
उचापती किति गांवामाजीं गावगुंड तो करी
कोणाला दे साह्य; कुणाची काढुन घे भाकरी
माया आणिक ब्रह्म यांवरी व्याख्यानें झोडित
'घोंटाळ्याचें ब्रह्म' तयाचें त्यालाही नुमजत ! !
जमे घोळका त्याचेपाशीं — त्यांत भगत भक्तिणी
गुंग जाहल्या दिसती कोणी मोक्षाचें साधनीं !
मूल होईना ह्मणुन कुणी स्त्री चरण तयाचे धरी
हात पाहुनी त्रिकाल ज्ञानहि सांगे तो झडकरी !
लग्नें जोडी आणिक तोडी पंचांगा पाहुन
आकाशीचे गोलक त्याला असती सर्नि वचकुन ! !

'बॅरिस्टर' हा खेड्यामाजी दिसतो बहु विक्रमी
अकलेचा फुलबाजा उडवुन पेटवितो दुहि-धुमी!
स्त्रीशिक्षण वा पुनर्विवाहहि तैसे सहशीक्षण
यांच्यावरती विचारपरिप्लुत करितो संभाषण
ज्ञान तयाचें पाहुन बोटें तोंडामधि घालिती
डोमाजी, झिबलाजी, बाजी रावजि अन् गणपती!!

---

## लांच्छन

—0—

[ षट्पदी; शा. वि. ]

उद्यानीं फुलली सुरेख अगदी रम्या लता लाजरी
स्पर्शोयास कुणीहि तीस बघतां लाजे अती अंतरीं!
लज्जाव्याकुळ व्हावयास नुरलें आतां तुला कारण
पौरुषत्व स्त्रियांत संप्रति शिरे; त्या माजवीती रण
मर्यादा जगतीं स्त्रियांस जरिही गे! जाहलें भूषण
आतांच्या चवचाल या नवयुगीं तें होतसें लांच्छन!

---

# पाठशिवण !

—o—

[ मुक्तच्छंद ]

१

उन्मेश जसे कीं क्षणप्रभेचे
क्रीडन चंचल, हिचेहि लाडिक
येणें सहजच---जाणें सहजच !—
ह्याका मारा—करा ओरडा
हिचा परंतु नाहीं पत्ता
जेव्हां जेव्हां लहर लागते
'दत्त' ह्मणुन ती उभी राहते !
दास्याचें हिज रुचें न बंधन !
कोण अशी ही यशोदायिनी ?
हिला बोलतांः " सुवर्णसंधी !!! "

२

गंभीरपणा भालावरती
हिरवटपणही मारी झांक
जडाभ्यासि हा ' मानभावि ' कां—
कुणि संशोधक ?
याचें नांव " मुहूर्त "
" ये ये, प्रमदे ! अशी जवळ ये ! "
ह्मणतो आहे तो संधीला
" अन्य दिनीं नच लागे मन्मन
नाजूक असा संकोच कशाला ?

सोड सोड ना तुझी मूकता ! ”
सलज्ज सस्मित बोले संधीः
“ हेका धरुनी तूं तर बससी
अमुकच दिनिं ये भेटायाला
येइन वाटे जेव्हां यावें
गुलाम नच मी; मीहि मानिनी ! ”
“ पण त्याऽऽ दिवशीं येशि न कां ग ? ”
“ जा मी नाहीं येणार अशानें ! ! ”
मनोज्ञ मुरका मारुनि संधी
वाऱ्यापरि जाहली नाहिशी
हृदयभग्न जणुं मुहूर्त होउन
मारित तिजला हांकाः
संधी ! संधी ! ! संधी ! ! !
अष्ट दिशांना पडसाद उठे
संधी ! संधी ! ! संधी ! ! !

३

मधेंच कोण्या दिवशीं टिचकी
त्यांस ऐकुं ये दारावरतीः
“ कोण ? ”
“ मी ऽ ऽ संधी ! ! —
वृत्ति रंगली माझी लहरी
खेळायाची आली मजला
आतांच हिरिरी
पडे कोवळें ऊन संप्रती
पीत प्रभा ही सर्व पसरली
त्यांतुन झिरपे पाउस झिम्‌झिम्

निशिगंधाचा कर्णा फुंकुन —
कामदेव हा —
चराचरांची वृत्ति फुलवित मादक धुंदीनें ! —
तर ऐशा या वेळीं
करांत अपुलें घालुन मृदु कर
खेळुं गड्या ये झिम्माफुगडी !!! ”
“ घातक वेळा शनिवार साजणी
चिखल मातला हा बाहेरी
मला वाटते कांबळ घेउनी
कानटोपीही चढवुन शीर्षी
खिडक्या दारें सर्व लावुनी
बुडि मारावी शून्यशोधनीं !!
तर पुढच्या वारी घटका बावन
पळे त्रयोदश
याच्या आगोदर केव्हांही
क्रीडा आपण करूंच निश्चित
सूर लागला तुझा परंतु
घसा बसोनी माझा सखये
गेला आहे याच क्षणीं
कंपित संधी हो क्रोधभरें
जळजळित असा कटाक्ष फेंकुन
गेली निघुनी भिंगरीपरी !!!

४

घटका बावन पळें त्रयोदश
घोंकित होती अपुल्या नादीं
स्वच्छंदी संधी !

लेउं कोणतें पातळ सुंदर
अस्मानी हें हरित किनारी ?
छे : ! राहूं दे; घे तें भरजरी
घालु कोणती नव आभरणें ?
साज चढविणें आणि उतरणें —
संपेना पण चाला लवकर
जवळ पातला संकेत क्षण ! !

५

मुहूर्त इकडे सजून बसला
मानसिं लागुन अतीव हुरहुर
कलला भास्कर पश्चिम क्षितिजीं
विलीन संध्या यामिनीमाजीं
द्वारावरती परि ओळखिची
टिचकी कां नाहीं अजुनी येत ?
निघून गेल्या बावन घटिका
पळे राहिली फक्त त्रयोदश
एकेक पळापळा बरोबर
जीव तयाचा हो वरखाली !
हृदिंचे ऐकूं येती त्याच्या
एकांतामधिं निष्पंद ! !
दशहि पळे हा ! आतां गळलीं
केवळ उरती आतां तीनच
" पळ चाललें — पळ चाललें — गेलें गेलें —
अव्यक्त देवते ! —
संधी ! संधी ! ! संधी ! ! ! "
दोनच आतां पळे राहिली

मुहूर्त जीवनज्योति मिणमिण
होती तेवत:
पण निश्वासासवें दीर्घ तो —
ह्मणतच आहे:
“संधी ! संधी ! ! संधी ! ! ! —”

६

— तोंच धडकली दारी थाप !
आवाजामधिं खोल आंतुनी
क्षीण निघालें तेव्हां उत्तर :
“सुरू जाहला याच क्षणीं ग !
दुष्ट असा व्यतिपात.
पळाचाच उशीर
हाय ! फक्त पळाचा !
आतां पुढें — पुढें कधीतरी !”
टाकी संधी विस्कटुनी अपुला साज
तोडितसे त्राग्यानें अपुले केश
हिंपुटि होउन पुन्हां पलटली
सळसळल्या क्षुब्ध नागिणीपरी ! !
कल्पवरी हा पाठशिवणिचा
चाले खेळ परंतु —
परंतु संधी — मुहूर्त मीलन
दिसलें कुणा न कधिहीं अजुनी.

७

भरारतो हा कोण मजेनें
स्वच्छंदी नभिं चंडोल जसा
रंगेलपणा तर आंगोपांगीं

तारुण्याची तडफ आणखी
रोमोरोमीं खेळे जोम
जातो येतो विद्युद्वेगें
चैतन्याचें नव आशेचें
चापल्याचें उत्साहाचें
उमेदिचें वा जणूं प्रतीकच.
हा " शिघ्रक्षण "

दिसला संधीला शिघ्रक्षण
दृष्टभेटही झाली त्यांची
नयन हांसलें बालिशतेनें
एकामेका ओळख पटली एकामेकाची.
अनुरागानें करिती स्वागत एकामेकाचे.
" प्रीतिदेवते ! —

चंद्र असे मी कीं तृतियेचा
होशिल कां तूं शुक्रचांदणी ?
तुझ्या सारखा मीही लहरी
जनिं वा विजनीं कोठेंही ने
साथ द्यावया केव्हांहि, तुला
एका पायावर मी तत्पर ! "
नर्मवचें ती झालि बोलती:
" तूंची माझा हृदयसम्राट् ! "
" साम्राज्ञी तूं मम हृदयाची ! ! "
प्रणयगूज तें निसर्ग ऐकुन
ह्मणतें आहे मिष्किलतेनें :
" द्या यांच्या पदरा गांठ ! "

तरुवेलीची जणूं जाहली एकरूपता
कटिखांद्यावर खेळे त्यांच्या
प्रेमाचें पहिलें फूल :

उ न्न ति बा ला !!

---

# ?? !! ??

—0—

[ अनुष्टुभ् ]

" भाग्यवंत जगामाजी दिसे यांत न संशय
संपत्तीला नसे तोटा केला मोठाच संचय १
मनाचा उमदा ऐसा दिसतो तरणा गडी
उत्साहानें कुठेंही तो घेतसे निधडी उडी ! २
घोडे, गाड्या बगीचेही शेतीभाती असे घरीं
सुविद्यही तसा आहे चालसे वकीली वरी !! ३
गांवांतील बडें धेंड पसारा मोठें कितीतरी
थोर कूळ असें त्याचें मोठा लौकिक सूवरीं ! ४
गोत्रही जुळतें त्याचें एकनाड न वा अडे
गुणही जुळती सारे उणी कोठेंच ना पडे ५
हुंडा घेई न पैसाही तिटकारा त्याजला मनीं
बाप, आई तसे बंधू गोत जीवंत आजुनी !" ६
" नाद बाहिरख्यालीचा आतां त्याला जरा दिसे "
" दोष कां तो कुणी मानी ? लेणं श्रीमंतिचें असें !" ७

“ लाल पाणी जरा पीतो आणा ध्यानांत कांहिं तें ”
“ मोठेंसें काय हो त्यांत ? श्रीमंता सर्व शोभतें ! ! ” ८

“ जुगाराचा जरा शौक ”— “ हु: हु: कांहीं तुह्मी ह्मणा;
थोडक्याकरितां लग्न मोडणें मूर्खताच ना ? ” ९

“ मुहूर्त पहिला शोधा जमवा लग्न सत्वर ”
साक्षगंध सुरूं झालें हास्य मोदा चढे भर १०

“ जातिवंत कवीही हा ”— मध्यें उद्गारतां कुणीं
यः पलायन सर्वांनीं केलें तात्काळ तेथुनी !!! ११

---

# आकर्षण

—0—

[ सुनीत शा. वि. ]

जेव्हां गोड निषेध ‘ इश्श ’ ह्मणुनी माझा करी सुंदरी
थट्टेची तसल्याहि औरच गमे कांहींतरी माधुरी !
किंवा ओझरता तनूस सहजी तत्स्पर्श जेव्हां घडे
तैं रोमांच असंख्य येति दिसुनी माझ्या शरीरीं खडे !

जेव्हां रोखित नेत्र सस्मित कधीं स्नेहाळ वा चोरटे
तेव्हां गोंधळ माझिया मनिं, तसें कौतूक नेत्रीं नटे !
किंवा झांकित नेत्र मिष्किलपणें ती येउनी मागुन
विद्युद्वेग जिचा उठे चमक ती प्रत्येक अंगांतुन ! !

जेव्हां उत्तरवासिनी उगवते देवी उषासुंदरी
तेव्हां चुंबन-वादळें उठुनियां जाती जगाच्यावरीं
पृथ्वींमाजि विराट चुंबक असे जो नेहमी सुस्थित
स्थानत्याग करून जाई करण्या तोही तिचें स्वागत
प्रेमाकर्षण या जडांसहि असें कीं हालवीतें जर
आश्चर्यास न वाव मर्त्य बनला त्याचा जरी किंकर !

---

# नको करूं अनुग्रह !

—0—

[ भूपाली ]

नको देउं आसरा, दयाळा ! नको देउं आसरा
सत्त्व पाहिल्यावांचुन पुरतें, चरणाजवळीं जरा ! १

भेटीचा सोहळा, दयाळा ! भेटीचा सोहळा
नकोस वितरूं, फोडुनि टाहो जरिही फुटला गळा ! २

नको शस्त्र आवरूं, दयाळा ! नको शस्त्र आवरूं
नको आवरूं शरसंधाना मेलें जरि पांखरू ३

खुपस बाण आपुले दयाळा ! खुपस बाण आपुले
तीक्ष्ण तीक्ष्णतर, ज्यांच्या अग्रां हालहाल माखलें ! ४

भरुनी आली दिसे, जखम ही भरुनी आली दिसे
खपली काढुन तीवर देईं लवण फासुनी कसें ! ५

आटूं दे पाझर, दयाळा ! आटूं दे पाझर
उष्णाश्रूंचा जरी वाहिला नेत्रांतुन निर्झर ! ! ६

कोणी कोणावर दयाळा ! कोणी कोणावर
फुकाच जगतीं अरे, घातली प्रेमाची पांखर ? ? ७

---

## सृष्टी विलास ! —

—0—

[ " फांसेपारध " ! — या खंडकाव्यांतून ]

[ चाल : गर्द सभोंतीं रान साजणी ]

शहरवजा हें गांव टेकडीशेजारीं कोणतें ?
संथपणानें वळसे देउन सरिताजल वाहतें १

वनपुष्पें मधु, करवंदांच्या जाळ्या घेउन तटीं
हरिणीदेवी जणूं चालली ललना कुणि गोमटी २

चहुंबाजूला नितांत मनहर पसरे मृदु हिरवळ
तुषारलहरी फेंकित तीवरि जलवंतीचें जळ ! ३

मधेंच भेटे निर्झर नव निज हिरव्या राईंतुन
सृष्टिदेविला करि अंगाई स्वन खळखळ काढुन ४

वाटे ऐसें मनास रव तो ऐकुनियां मंजुळ
सृष्टिदेविच्या काय वाजती पायांतिल पायल ? ५

मेंढपाळ कुणि मुखास लावुनि बोरूची पावरी
निनाद मनहर काढुन लयभर, अनंत अंबर भरीं ६

कुण्या खगाच्या मुखांतुन झरे संगीताची गत
पड्याळपुंजहि मान उभारुन डौलानें डोलत ७

कुणी शेतकरि माळांमधुनी काढी तारस्वर
दिव्य शांतता कुठें मोडिती ' रेंगी ' चे घुंगर ८

मधुनी मधुनी विस्तरलेले पिंपळ औदुंबर
छायेखालीं खुशाल पेंगति मौजेनें बनकर ! ! ९

---

# महाराष्ट्रास !

—0—

[ मंदारमाला ]

तूझें " महाराष्ट्र " हें नाम गर्जे दिगंतीं गमे तूं कुणी केसरी
सारी पदाक्रांत केलीस भूमी, तुझ्या वैभवाला दिसे ना सरी
सामंत, भूमीपती, चक्रवर्ती सभोंताळचे सर्व राजेश्वर
रे! लीनतेनें पुढें वांकुनीया, उभे ठाकती जोडुनियां कर १

साम्राट् गिरीकाननांचा असें नाम तूझ्या कृतीनें पुरा लाभलें
तें दृश्य डोळां दिसें द्यावयालाच ताजीम तूतें पशू चालले
हें आठवीः घोर तूझ्या रवानें गिरीगव्हरें सर्व नादावलीं
घेवोनियां जीव शत्रू पळाले तुला पाहतां मागल्या पाउलीं २

तूझ्याच आतां परी दुष्कृतीनें अशी पातलीना दशा संप्रती ?
हा ! हीन जंबूकही क्षुद्र तूतें महाभाग ! निःशंक वेडावती ! !
जीवन्मृतासारखा तूं जहालास, निष्क्रियता मानसा येउनी
गालांत हांसुनि चेष्टा करीती तुझ्या या स्थितीला कुणी पाहुनी ३

सह्याचलाचे न, धैर्याचलाचेच उत्तुंग आकाशभेदी कडे
देती न हे काय तेजस्वितेचे तुला नेहमी पूर्वजांच्या धडे?
कृष्णादिकां या नद्यांचें न तूं काय प्राशियलें सांग स्फूर्तीजल?
जैसा तुझा भूत, तैसाच भावीहि व्हावा न कां काळ रम्योज्वल? ४

आतां वनश्री दणाणून सोडी रवानें तुझीया क्षणाभीतरीं
ऐशी जया ऐकुनी श्वान जंबूक सारे दडावेत कोठेंतरी
काढोनियां टाक तूझ्याविशीं जो वसे त्यांचिया मानसीं संभ्रम
पंजे पुढारून आतां तयालागि दावी जरासा तुझा विक्रम!!! ५

---

# अरधेंच ठेव तव गीत!

—0—

[ मुक्तच्छंद ]

१

शरीरसौष्ठव रम्य मनोहर
मर्यादेचें तयास वेष्टन
मिश्रण तेथें अनुराग-कलेचें
विलोललोचन-खगोलज्योती
मिठास भाषण मुखश्रींतुनी
ओष्ठीं मादक गीतक गुणगुण!
—पाहतांच मज गीत थबकलें
मिटल्या ओष्ठांत
धडधडणारी भावोत्कटता—

तरळल्या प्रणयछटा—
भालावरच्या नाजुक आंड्या—
शुभ्र गोलशी मान वेळणें—
अंगुलिचा पदराशीं चाळा—
आणि उसळती हास्य-लकेरी
क्षणभर होती सारे अचल
चित्रासम तूं झालिस निश्चल!
तसेंच राहूं दे — तसेंच राहूं दे
मोहक अरधें चित्र
अरधेंच ठेव तव गीत
अस्फुट, अस्फुट
संपवूं नको! — संपवूं नको!! —

२

अपूर्णतेमधिं अवीट गोडी
पूर्णत्वामधिं नेउन तिजला
भंगु नको मम सौख्यस्वप्न.
वेषभूषि झिरझिरित तलमशा
रमणीकांती अतीव सुरुचिर
अपूर्णतेमधिं सौंदर्याची—
पूर्णता, अपूर्वता, जादू अन् उन्माद!!!
अदृश्य अरधें, अरधें गोचर
यांतच सौंदर्याची सीमा
अमरचारुता!!
लावण्याची दीप्ति तेजस

सौंदर्याची कळा—
प्रीत गुलाबी—
फुलत्या पुष्पाहुनी, मूक कलिकेंमाजी अतितर
कलाधरावी कला इवलिशी
पूर्णचंद्रम्याहुनि आकर्षक
ह्मणुनीच तुला विनति—
अरर्धेंच ठेव तव गीत
संपवूं नको — संपवूं नको !! —

---

## युक्ति पण युक्ति !

—0—

[ शा. वि. ]

चालेना वकिली उमेद धरुनी केले कितीही श्रम
वाटे मानासिं कीं चतुर्थ बरवा घेणें अतां आश्रम !
तों युक्ती सुचली, तशीच दिधली टाळी स्वहस्तावरीं
'लेडी' कारकुनास एक पदरीं मीं ठेविलें सत्वरी !
'ऑफीसा' भंवतीं आशीक जमले; झाली तदा झुंबड
मेजाच्यावरतीं मदीय पडले नोटारुप्यांचे फड !!!

# प्रणयगूज

——0——

[ अष्टपदी ]

[ चाल: गर्द सभोंतीं रान साजणी ]

कंदर्परसें लिहिल्या ओळी कांहीं कपड्यावर
दिसें न नेत्रां त्यांतिल एकहि कोणाला अक्षर
अग्नीवरतीं कागद धरतां चमत्कार होउन
अर्थासह ते वर्ण जाहले दृश्य; थक्क मन्मन !
प्रीतिरसें मी लेख लिहितसें तुझ्या अंतरावर
मला तुलाही कळलें नाहीं त्यांतिल लव अक्षर
प्रीतीची तव ऊब लागतां प्रकट वर्ण होऊन
प्रणयलेख तो स्पष्ट जाहला; स्तिमित आपण !

---

# भवितव्यता

——0——

[ सुनीत—शा. वि. ]

सौख्याचा मधु वर्तमान करितो क्रीडा गमे सांप्रत
फेंका दृष्टि कुठेंहि सर्वच दिसें हें स्वर्गसौख्यान्वित !
लाभे सत्सहचारिणी मज अहा ! मत्जीवितेकेश्वरी
बाळें विस्तरितीं सुहास्य-कुसुमें संसारमार्गावरी !

मायापांखर घालिते मजवरी माता किती प्रेमळ
सारे बांधव दाविती स्वहृदिंची सद्भावना निर्मळ
आहे यौवन, जोम मानसिं तसा; कोठें न कांहीं उणें
कर्तृत्वास ह्मणूनियां गमतसें आकाशही ठेंगणें !

भावीकाल असेल रम्य अथवा होईल तो भीषण
चिंताक्रांत कधीं कधीं बनतसें ऐशा विचारें मन
वेई झोंप हिरावुनी सुखद नी स्वांता करी विव्हल
किंवा कालवि जीवितांत गमते तो वीष हालाहल !
देवा ! या भवितव्यतेवरि तुवां टाकून आच्छादन
केलें दुःसह दुःखयुक्त सगळें हें मानवीं जीवन !!

---

## हांक !

—0—

[ जाति : प्रणयप्रभा ]

मज निरोप देतांना रमणी
वद भरें नीर कां तव नयनीं ? ॥ ध्रु० ॥
देह कांपरा, कंपित कां स्वर ?
शोकांमाजी पडसी दुस्तर
पाझरेल त्या बघतां प्रस्तर
कां दीर्घ उसासे फिरफिरूनी ? १
मातृभूमिची हांक थडकली
दुःखित झाली दीन माउली
झांपड डोळयावरची उडली
वद कसें मिळावें सुख शयनीं ? २

आजवरीचा मन–सुरवंट
फुलपांखरू बनला धीट
उडूं पाहतो नभिं सैराट
रोखण्या समर्थ न त्यास कुणी ! ३
मायेच्या तव मोहसागरीं
खेचुं नको ग ! आतां लवभरि
नवजीवनरस उसळे अंतरिं
जाउंदे जीव हा उद्धरुनी ! ४

× × ×

शेवटलें मग घेउन चुंबन
कसून दिधलें प्रेमालिंगन
आणि शेवटीं बाजुस ढकलुन
भरधांव सोडिला वारू रणीं
खेंचून आणण्या रण–रमणी ५

---

## प्रीतिपायीं !

—0—

[ चाल : हृदय सांग चोरिलें ]

मोह सोड बाघुला ! पळ करी त्वरा ! ॥ ध्रु ॥
रूपसंपदाच दिसे
लावि मना सहज पिसें
प्रीतिपायिं होउं नको आज हांवरा ! १

जळजळीत दीप्ति ही
रोमरोमिं दिसुन येई
तेजानें लाजविते गमत भास्करा २

हा दिसतो क्षण अमोल
जाउं नको देउं तोल
परत परत आपल्या आजला घरा ! ३

× × ×

सौदामिनि प्रीत तरल
मोहक, परि तीव्र गरल
प्राशिलेस जाणुनियां आज पांखरा ! ४

प्राण पांखडुन अती
झांडुनियां पांखतती
हृदय फुटुनि हाय ! तुझें जाहलें चुरा ! ५

× × ×

प्रेमपाशिं आजुनीहि
देह तुझा रमत राहि
मृत्युमार्गींहि प्रीत दिव्य होई गोचरा ! ! ६

मार्गि पथिक हे अजाण
हांसतात तुजशिं जाण
प्रणय यशा नेईल कवि परि दिगंतरा ! ! ७

---

# वज्राघात *

—0—

[ सुनीत ]

[ चाल : गर्द सभोंतीं रान साजणी ]

तांडव घाली करुनी राहू कृष्णकृत्य अंबरीं
धरी प्रजापति* नजर वांकडी खुशाल तनुजेवरी
चंद्र होउनी कामुक भोगी अमर्याद, रोहिणी
गुरुपत्नीशीं जारकर्मही करी तसें खलमणी !
आपत्तींच्या मानवावरी राशी वितरी शनी
ध्येयापासुन ढळोत अपुल्या खगोल सारे क्षणीं
विषण्णता नच अढळ जोंवरी गगनीं ध्रुव-तारक
सुनीतिचा जो अखिल जगाला असे सदा प्रेरक ! !
कळून आलें ध्रुवही चळतो करूनी स्थानांतर
वज्राघातच होई तेधवां मानव हृदयावर
घोर कुटिलता-तिमिरीं जग हें चांचपडें बापुडें
कुणाकडे तरि पाहुन त्यानें टाकावें पद पुढें ?
तुटला जगिं आधार नीतिचा; सत्या नुरलें बळ
कलेवरच हें सन्मार्गाचें उरलें जगिं केवळ ! !

---

* ही कविता सन १९३९ च्या राजकारणास अनुलक्षून आहे.

* एक ग्रह ( युरेनस )

# या पक्षकारा ! !

—0—

[ आर्या ]

१

वाट तुझी पाहुनियां शिणुनी गेला मदीय जीव गड्या !
नेत्रांच्या दिनरात्रीं तुझिया मार्गींच पापण्या उघड्या !
कोठें खडबड होतां, वाटे आलाच पक्षकार नवा
फंडास्तव गुंड उभा दिसतो दारांत साधण्या कावा !
किंवा ' दे० भ० ' कोणी डोकावुनि पाहतो ' हपिसां ' त
कोणी ' चरखिवाला ' केंव्हां केंव्हां बघे अती अंत
आवारांमधि शिरतो मधुनिच मळकट कुणीहि तेलंगी
पैशा दो पैशास्तव बेजा करितो अरे पहा तंगी !
वेरी वेळिअवेळीं किंवा ' ए. आय. आर.' एजंट
यांना लाज न उरुनी, झाले असती बरेच कीं चंट ! !

२

कोणि बिलंदर भेटे तुजला मार्गांत काय ' टाऊट ' ?
त्यानेंच लाविला कां मंगलकार्यास या अशा नाट ?
तुजकरतां खानावळि आणि उतारे तसेच बाजार
फिरुनि चाळण केली पायाची; जीव होइं बेजार !
खोज कुठें ना लागे; मानस भेटीस फार आतूर
परि तूं पळसी देउन हातावरतीं असा कसा तूर ?
जरि तूं देउनि गेला यापूर्वी कितीकदां मला चाट
तरि तुजविषयीं अंतरिं आजुनिही प्रेम वसतसें दाट !

तुजकरतां वसलों मी 'ऑफिस' लावून पाहि, थाटांत
हे कायदे गरम वा थंड* तसे जोडुनी पुढें हात!
'हॅट' तशी 'सूट' नवे, बूट पहा करकरीत हे नामी
हे 'केस' जिंकण्याला येती काय न मुलींच रे कामीं?
हंगामावर दे 'फी,' 'ऑफिस' कर पण जरा सुशोभीत
तुजवांचुनियां बैसे वकील कोटरिं जसा दिवाभीत!!

---

## नवलाचं पांखरूं

—0—

[ लावणीवजा ]

कुन्या रानचं, कुठून झुकलं नवलाचं पांखरूं
लागलं मनांत माझ्या भरूं! ॥ ध्रु० ॥
किति गोंडस दिसतं, सहज लअकलं जरी—
काळ्जाचा देवाच्यान् तोंडी लचका तरी!
याच्याकडं पाहतं बसतों येड्यापरी!
इच्छा होई एकदाव तरि याला र! गोंजरूं
परी झे उडतय् किति भुरुंभुरुं १
मोकाट राहनं याला रुचतं सदा
वाऱ्यावर हिरव्या अक्षी असतं फिदा
कीं हवा जिवाचा याला सोबति सुदा
हाति न गवसें कांहीं केल्या नदर देई ना ठरूं
कोणती हिकमत आतां करूं? २

---

* 'वकीलसाब! गरम कायदा बताव: थंडा नहि बताना!' अशी एका संन्याशी पक्षकाराची मला सूचना असे!

रंगढंग नाना नवीन करतं कसं ?
गुल्जार मारु ह्यें जडतं याच पिसं
ह्यो गबरू झाला याच्यावर दिल्खुस
—क्येला जिवाचा धडा इचभिन् * मरणहि त्यें पत्करूं
एकदाव् कवळुन पन ह्यें धरूं ! ! ३

---

## सावधान !

—0—

[ जाति : स्वर्गगा ]

निराश्रीत हे किसान झाले त्राता न कुणी त्यां उरला
हालहि त्यांचे कुत्रा खाइ न, ऐशा कटुतर समयाला !
श्रीमंती गरीबीस हांसते, छेडुन करते उपहास
एकदिनीं परि उद्रेक याचे निघेल गमतें मज खास !
सुंदर इमले, उंच मनोरे भव्य प्रासादहि जगतीं—
यांसच वीजेपासुनि भय, ती बघे कोसळूं त्यांवरतीं
लोहशलाका क्षुल्लक असुनी रक्षण त्यांचें करी क्षणो
क्षुद्र वस्तुंना म्हणून कधिही अवमानुं नका लव कोणी !
फलभारांनीं वृक्ष वांकुनी खालीं येई भूमिवरी
बांबूची पण काम्री वरती सांवरुनीयां त्यास धरी !
दुबळी वाटे अजा आपणां, पचवुनि टाकी कटु कांटे
हीन दीन जरि कुणी जाहला जाउं नका त्यांच्या वाटे !
पापड निर्जिव आंच लागतां त्यालाही लव वक्र बने
अंगा कांटे झडकरि फुटुनी लाल बनतसे रोषानें

---

* ' इचिबहिन ' हा शब्द वऱ्हाडांत खालच्या लोकांत अती रूढ आहे.

भिकार गणुनी धूळ तुडवितों आपण तिजला पदोपदीं
कुणी ह्मणावें नेत्रीं शिरुनी ताप न देइल ती अगदीं ?
व्यर्थ घमेंडीमधीं जाउनी दीनजनांना छळूं नका
मत्तपणाला रोखायाला ' बंडखोर ' नच निघेल कां ?
सजातीय नी विजातीय या वीजा येतां जइं जवळ
आकर्षण मग घडून उठतो तेजाचा नव कल्लोळ
तत्व असें हें ध्यानीं आणा; गरिबी आणिक श्रीमंती
समता यांची घडून येतां नांदेलच जगिं सुखशांती !!!

---

# मानवी औदार्य

—0—

[ षट्पदी. शा. वि. ]

बीजेची मधु कोर जैं उगवते नाजूक, नीलांबरीं
वस्त्राची दृष्टि फेंकितों तिजकडे तोषोनियां अंतरीं
' झालें दान बहूत,' मानसिं असें आह्मी जरी मानितों
त्यामाजी अमुचा स्वभावच परी तो हीन डोकावतो !
जेव्हां तूं करिशी प्रभो ! पण दया-वर्षाव दीनांवर
घ्यायाला पुरतील दोनच कसे हे मानवाचे कर ?

---

# एकादाच !

—0—

[ शा. वि. ]

सौंदर्यें नटली मजेंत विभवें रंगीत पुष्पावली
घेई झेंप तयांवरी ह्मणुनियां रंगेल भृंगावली !
त्यांचे केसर एकठायिं अगदीं स्पर्धे जणूं आणिती
त्यांची वंशलता समुत्सुकपणें वाढीस ते लाविती

सृष्टीमाजि वनस्पती बहुपरी, सौंदर्यसंपन्न न
कोणीही ह्मणुनी न पाहत मुळीं त्यांच्याकडे ढुंकुन ! !
वायू एकच या जगीं पण पहा तद्वंशवृद्धी करी
त्याचें ब्रीद परोपकार ह्मणुनी साह्यास ये सत्वरी

श्रीमंतीवर विश्व खूप सगळें, दास्यत्व तीचें करी
एकादाच कुणी स्वलक्ष करतो जाणून दीनांवरी ! !

---

# नश्वर व चिरंतन

—0—

[ चाल : गर्द सभोंतीं रान ]

सिंधु खवळला भीषण होउन त्याच्यावरि वादळ
गगनचुंबिनी लाटा उसळति; अथांग हलतें जळ !
घोर गर्जना होउन झालें स्थिरचर कंपित मग
जिकडे तिकडे काळवंडलें; उदास झालें जग

समुद्रपृष्ठीं तारूं एकट फिरतें कोठें दिसें
हेलावे तें इकडुन तिकडुन घडीघडी घेतसें
प्रणयाची ती प्रतिमा चंचल खेळे दर्यावरी
काळवेळ नच भंग पावण्या तिजला निमिषांतरीं !
कोपऱ्यांत कुणि होतें होकायंत्र ठाण मांडुन
जहाज खाई झोंके याचें अचल परी आसन !
क्षितिजाशीं राहणें समांतर धर्मच याचा असे
पार उलटलें तारूं त्याची क्षितिही याला नसे !
दिव्य प्रीती अशीच असते अविनाशी सुस्थिर
चळे न लवही आपत्तींचे कोसळतां डोंगर ! !

---

## मगरमिठी

—0—

[ मुक्तच्छंद ]

१.

पर्वतप्राय प्रचंड लाटांनीं
खवळे सागर !
हिंस्रपशूसम आरोळ्या जणुं
टोंकित फोडित !
' लोहचुंबक-पाणसुरुंग '
दर्यामाजी कुणी उभविला
संहार-सत्र जणुं सुरूं कराया
' लोहतारूं ' ला आपल्याकडे

लीलेनें खेंचुन घेई सत्वर !
तारूला कल्पना न त्याची
दिशेकडे जाण्यास विरुद्ध
तारूं करि धडपड केंविलवाणी
अदृश्य परी कोणीतरि कर
हळुहळूं पण अगदीं निश्चित
खेंची त्याला
—आणि त्या सुरुंगावरी
तारूं जाऊनियां आदळे :
स्फोट होउनी तात्काळ भयंकर
राइराइ एवढ्या ठिकऱ्या उडती
गडद अफाट अंधःकारामाजी
अब्धीच्या त्या विलीन होती !

२.

मायेचा सैतान दुरात्मा
स्त्रीरूपानें अतीव कमनिय
कक्षेंत ओढतो मानवि संयम !
मायाविनिची मोहक शैली
हंसरे डोळे, फसव्या चेष्टा
प्रणयाचे चाळे सूचक
उघडें नवयौवन ! —
अनर्थ भीषण आणी घडवुनि
पाणसुरुंगाहुनीहि शतपट
हत्या, खून, स्तेय
अधमत्व, कौटिल्य—

आणिक इतरहि कृष्णकृत्यांची
वाटे जनती
कांचन कामिनी !!
गारूड नवीनच प्रतिक्षणाला !
जलाल मद्यार्काच्या आमिषें
किंवा जुगार-डाकिण रूपें
कृत्या करालवदना निर्मी
मगरमिठि तोडाया त्याची
कोट्यांशही सामर्थ्य नसे संयमा
तो दुज्या दिशेकडे-सुनीतिमार्गी—
जाण्यास धडपडे
नकळत त्याच्या परंतु निश्चित
मायावी रूप घेउनी
मायेचा सैतान आपुले—
नागपाश पल्लेदार विमोहक,
आवळीतसे अधिकाधीक मजेनें !!
अगतिक चाले संयम-धडपड
शेवटिं जाउन त्यावरी आदळे
तात्काळ चुराडा बने तयाचा !!

३.

संहार कराया, काय कुणीं
अखिल ' मानवी सत्वा 'चा
विराट विश्वचक्रसागरीं
उभविला ' महामोहा ' चा
लोहचुंबक-पाणसुरूंगच ? !!

# कधीं ?

—0—

[ चालः— यापरी असें जीवन ]

तळमळे निशिदिनीं मन
दिव्य कधि यायाचा तो क्षण ? ॥ ध्रु० ॥

राष्ट्र–भक्तिची चिमुकली
ही उर्मि इथें उसळली
परि लाट भयंकर तिची अंबरा
जाइल कधिं भेदुन ? १

ठिणगी ही क्षुल्लक असे
राखड जरि तिजवर दिसे
होउनी स्फोट परि चमक विजेची
देइल कधिं दाउन ? २

राष्ट्र–भक्ति अणु भारतीं
खेळतो अहा संप्रती
कधिं विराटरूपा घेऊन टाकिल
दिगंत परि व्यापुन ? ३

राष्ट्र–भक्तिचा अंकुर
उगवला भरतभूवर
वटवृक्ष तयाचा जाइल कधिं पण
प्रचंड विस्तारुन ? ४

राष्ट्रतेज बटु वामन
उजळलें इथें पावन
त्रैलोक्य कधीं तें पायांखालीं
घेइल पण कवळुन ? ५

# एक दुःखपर्यवसायी कथा

—0—

[ शा. वि. ]

आला एक अशील, आणि ह्मणतो: " दावा करा दाखल
कर्जाची ऋणकोस ना मुळिंच या माझ्या पहा दःखल !
देतों काढुनियां तुह्मास पुढच्या पेशीस मी नक्कल
काढा कांहितरी सुपीक तुमच्या मेंदूतुनी शक्कल

आतां जे फसले हजार रुपये ते काढुनी द्यावया
दावा हा लढवा; मुळीं न अगदीं दावा तयाला दया
कोणीही जरि जाहला वकील तो घेणार 'फी' चाखुन—"
ब्रह्मानंदविलीन मी क्षणभरी वाणी अशी ऐकुन !!

आणी दैव सुवर्णसंधि असली कित्येक मासांतुन
'ही आतां बढलीच 'प्रॅक्टिस' ' अशा स्वप्नांत मी तल्लिन
दावा मी खरडून त्यास ह्मटलें " 'फी'चें करा बोलणें ! "
तेव्हां तोंड करोनि तो बसतसे केसें नको सांगणें !!!

" 'दावा आपण हा कराल अगदीं धर्मार्थ (!!)' सांगें मन
मोठें पुण्य परोपकार गणिती भूमीवरी सज्जन !
ओढाया अशिलांस मार्गि टपती 'टाऊट' पक्ष्यांपरी
गुंगारा सगळयास देउनि परी आलों इथें लोकरी !

केला मीं बरवा विचार मनिं कीं, हीं माणसें आपलीं
यांना आश्रय देउनी उपकृती कांहीं करावी भली !! "
—वाटे ही फिरते धरा ! पुढतिं जें झालें न तें ठाउक
थंडागार बनूनि मारिलिच मीं खुर्चीमधें बैठक !!!

---

# शेवटीं

—0—

[ चालः— ' म्हातारी ' ची ]

पांचोळा जीर्ण भूमिवर होता कोठेसा
सळसळ कटुनाद करुनियां राही तो सहसा !
जणुं ईशस्तवन गुणगुणे वाटे कधिं ऐसें
पिंगटवर्ण खुले ऋषीवर कविनेत्रां भासे
परमार्थी गोडी लागली संसारा विटुनी
' साधक ' जणुं ध्यानीं बैसला तल्लिन होवोनी !

वृक्षहि एक तिथें तयावर सर्व तरूराजी
बहाल पूर्णपणें दिसतसे होती अति राजी
याचें कारण कीं, वैभवें चमके तो लोकीं !
पुष्पीं नटलेला भासला कोणीतरि शौकी !
रूपाची सीमा तेथली एक लता-राणी
प्रेमभरें त्याला बैसली विळखा देवोनी
पादपगण इतर पुत्रची त्याचे जणुं गमती
हरितांकुर कांहीं नातवें शोभुनियां जाती !
' अहंकारा ' ची बद्ध ती मूर्तिच मज गमली
गर्वभरें बोले " करुनियां सळसळ यावेळीं—
मूर्खा ! कितीदा निशिदिनीं अमुच्या कानाला "
परि तो पांचोळा सोडिना अपुला लव चाळा !!

नवयौवन बहर विलसतां पाचोळ्या कोण—
विचारील सांगा ? मत जणूं वाटे तें जीर्ण !!
व्यवहारी जगता तिरस्कृत बैसे होवोनी
कोणीही येवो जातसे त्याला तुडवोनी !!

दावानल पेटे आहळे तें सगळें रान
आक्रंदन करिती होउनी सगळेची दीन
कडकड करुनीयां वृक्षवर कोसळती खालीं
नाजुक लुसलुशित जाहल्या खाक किती वेली
पांचोळा परि तो चालवी आवडिनें भजन
वीतरागिश्राला उरावें कसलें तरि भान ?
वायू वेगानें पातला तेव्हां त्या ठायीं
विमानांत दिव्य आपुल्या पांचोळ्या घेइ
पुत्रपौत्र कांता वैभवें यौवन सांगाती
यांसह तो वृक्ष मिळतसे धूळीला अंतीं !
झाला आरूढ दिसतसे स्वर्गी पांचोळा
राखड होवोनी वृक्ष परि भूमीवर पडला !!

---

# दिलजमाई !

—0—

[ चालः— मज गमत गगन निकटिं ]

आज साज अभिनव तव दावि झकपकाई
अन् लज्जास्मित गालीं करित रोषनाई ! ॥ ध्रु० ॥
सोनेरी तव कांती
पाडतसे मज भ्रांती
सर्व इथें दिसत मला आज नवनवाई ! १
झालि जरा नजरभेट
अंतरंगिं शिरत थेट
मेधवांच हो अपुली खचित दिलजमाई २

कांटेरी मोहजाल
मजभंवती पसरशील
कल्पना न हार्दिक तूं करुनि सरबराई ३
नटनखरा हावभाव
अंतरिचा घेति ठाव
मज हातोहात तुवां बनविलें सफाई ४
होते मज जग असार
हातिं येत सौख्यसार
रूपराशि मिळुन गमत जाहली कमाई ! ५

---

# काव्यात्मा !

——0——

[ चालः— हृदयंगम संगम रमणी ]

१.

काव्यात्मा गमतो मज हर ! ॥ ध्रु० ॥
स्मशान त्याचें घोर निकेतन
पिशाच्चगण करि तांडव नर्तन
सृष्टिसतीवर जडलें तन्मन
नमिती त्या अखिल सुरासुर !

२.

भटकत राहे वल्कलधारी
गिरिकुहरांतरि विपिन–विहारी
विरागमूर्ती तो त्रिपुरारी
भस्म करी त्राग्यानें स्मर

३.

जटाभार तन्मौलिं विराजे
चंद्रकला सुखशितल साजे
कडकड डमरू निनाद गर्जे
फणि खेळे कंठीं निर्भर !!

४.

भालावरतीं शांत शुभांगा
दाउनि अपुल्या प्रीतितरंगा
झुळझुळ वाहे निर्मल गंगा
काढुनियां कलरव मर्मर

५.

निर्मितसे भय मानव-स्वांतीं
रुंडमालिका वक्षावरतीं
त्रिशूल परशू खेळति हातीं
व्याघ्रांबर विलसे कटिवर

६.

चर्चि विभूती अंगालागीं
झोळी घेउन फिरतो जोगी
अनेक आपत्तींचा भोगी
जगताचा नाथ दिगंबर !!

———

# राग कीं अनुराग ?

—o—

[ वृत्तः— शा. वि. ]

आलें मानसिं, कांहिं गंमत 'तिची' आतां करावी जरा
मोठा रागिट आणि खिन्न करुनी मी बैसलों चेहरा !
नाहीं शब्दहि बोललों; नच मुळीं दृग्पात वा टाकिला
सोडोनी पण दीर्घ निश्वसन मीं उष्णाश्रुही ढाळिला !! १

दृष्टी लावुन शून्य भिंतिवरतीं, मोठ्या विचारांत मीं—
आहें भासविलें; जणूं बुडुनियां गेलों निराशातमीं !
आठ्या मस्तकिं घालुनी, उडविलें नासाग्र किंचित् वरी
आलें हांसु, परी तसेंच धरलें दाबोनियां अंतरीं !! २

जों जों वाढत रोष, तों अधिरता वाढे तिच्या आननीं
आला दाटुन कंठ, कंपित तनू, वृत्तीहि झाली सुनी
"ऐसें संकट कोणतें"— वदतसे "सांगातरी पातलें ?—
वाटे भीतिच बाइ ! काय तरि तूं देवा मनीं योजिलें ?" ३

चावोनी अधरोष्ठ मुग्ध बसलों तें ऐकतां भाषण
अर्धोन्मीलित कांहिंसे करुनियां विस्तारले लोचन !
रागावून 'तरीच !' 'ठीक !' वदलों संदिग्ध कांहीं असे
तों तीचें हळुवार मानस किती खालींवरी होतसे ! ४

थोडा कातर काढुनी स्वर ह्मणे, "सांगा गडे ! सत्वर
कां झाला रुसवा तया परिसण्या झाल्यें मनीं आतुर"
"जा जा येथुन !" मान मीं वळविली जोरांत हें बोलुन
अश्रूंचा सर ओघळे परि तिच्या स्नेहाळ नेत्रांतुन ! ५

कष्टानें कितिवेळ हास्यलहरी जी दाबुनी ठेविली
जोरानें मनसोक्त ती उसळुनी बाहेर हेलावली
—लोपे खेद; गुलाब गोड फुलले गालीं तिच्या काश्मिरी
होतां जागृत ती स्मृती, अजुनिही आनंदतों अंतरीं !! ६

---

# विषमता

—०—

[ चालः— चंद्र चवथिचा ]

१.

सहज एकदां— हाटीं मीं वळवियलें आपुल्या पदां
तेथ पाहिलें— मेषयुग्म सुंदरसें; नयन लोभले
नीट निरखुनी— शेतकरी विकत घेइ एक त्यांतुनी
लगबगा कुणी— येउनियां दुसऱ्यासहि जाइ घेउनी

२.

कुरण मोकळें— रतिमंदिर सुंदर पहिल्यास अर्पिलें
फेर धरुनियां— फिरति अजा भंवताली घेउनी तया
व्रजविलासिनी— कुंजविहारीच काय खेळती वनीं ?
भाग्य तें निकें— अहिर युवक गाति तया गोड गीतकें
रोज नवनवी— बालकिरणें कधिं सुखोष्ण मौज अनुभवी
कधिं दिनांतरीं— धनि फिरवी लाडानें कर तयावरी !
ओहळातटीं— हरितगार मृदुल अशा गर्द निळवटीं
प्रणयि झिंगुनी— प्रणयमूढ भोगितसे कामरूपिणी !!

३.

ऊर जाहलें— विकल, देखतांच दुजें दृश्य तेथलें
चालला वुजा— नियति–दानवी बळेंच भोगण्या सजा !
भीषणा किती— हंसवि कुणा रडवि कुणा धाय धाय ती !
ओढिती तया— मांगमनीं उपजावी कशि तरी दया ?
मूक जीव तो— दीन किती स्वर भेदक अहह ! काढतो
फिरवुनी सुरा— कंठनाल टाकियला छेदुनी पुरा !
पाहुनी तदा— दैवदुर्विलास हंसत विकट खदखदा !!

---

# दत्ताजी शिंदे

——0——

[ चाल : श्यामाराणी गंभीर रजनी ]

आज जाहलों जरि लाचार
बेगुमानपणें वदतों स्वैर—
" डागळलेलें नांव उजळवी दत्ताजी शिंदे ! " १

शिलेदार कीं त्याचे सम तो
अभिमानानें आम्ही ह्मणतों
धरित्रीवरी असोत दुसरे वीर कुणी धंदे २

महाराष्ट्र–भू झाली अगतिक
अविंध–शासन होई जाचक
मराठमोळे होति करंटे, यवनांचे मिंधे ३

शिंदे सरले धरून हिंमत
राखाया राष्ट्राची इभ्रत
चौखंडांतारिं कीर्ती ह्मणुनी अमुची अजुनी नांदे ४
बावन पागा लढति धारकरि
खचली शिंदेशाई सत्वरि
धीरश्री परि जागृत ठेवी दत्ताजी मोदें ! ५
'बचेंगे तो और लढेंगे !
नसति मराठे लुंगेसुंगे !'—
जबाब ऐकुन रोहील्यांचें कालिज हो अरधें !! ६
अब्दाल्याची नव अब्दागिरि
तयें आणिली खेंचुन भूवरि
मोतीझालर धुळीस मिळवुनि धारातीर्थी दे ७
झगडा देउन दावि कडाका
पहाड पडला शेवटिं बाका
साहस त्याचें बघतां शत्रू मित्रहि शरमिंदे !! ८

---

# इषारा !

—0—

[ मुक्तच्छंद— अक्षरलेखा जगती ]

भीषण अकाळ विक्राळ स्वरूप
दावित पातली विपत्तीमालिका
एकची करावा ग्रास या हेतूनें
जिमाल्या घाटी—

तदा होई मनीं तुझ्या विषयींच्या—
भक्तीचा उदित भव्य नंदादीप
पाजळली ज्योत अत्यंत दीप्तीनें
धींवसाही आला अखंड कृष्ण—
सारी संकटांची जातील विरून
वातावरणांत !

कंठशोष केला लागूनियां ध्यान
भक्तीदीपें तुला न्याहाळिलें तरी
तुझा नच माग !

दीपिका—कलिका अती मंदावून
इवलासा तंतू कानाकोपऱ्यांत
असेल कोठेंसा रे ! मिणमिणत !
तोही लवलाही होईल विलीन
अंतीं अनंतात !

जरी चिंता मनीं मालवेल पूर्ण
लागवेगी धाव विद्युल्लतेसम
ओत स्नेहबिंदू जागवी ती ज्योत
पळाचा विलंब घोर पश्चात्तापा
तुझिया, सांगतों होईल कारण !

# काव्य-संन्यास !



## ( कथासूत्र )

गुणाढ्य नांवाच्या महाकवीनें सात लक्ष काव्यांची रचना करून तें आपल्या अंगच्या रक्ताच्या शाईनें लिहिलें होतें ! आपल्या कवित्वाचें चीज होईल या अपेक्षेनें तो सप्तवाहन राजाकडे आपलें सर्व लिखाण घेऊन गेला. दरबारच्या अरसिक मानकऱ्यांनीं त्याचा उपहास केला, तेव्हां त्याला उद्वेग प्राप्त झाला; व जवळच्या रानांत जाऊन, अग्निकुंड सिद्ध करून त्यानें आपलें काव्य जाळून टाकलें ! तें जळत असतां त्यानें काव्यगायन करावयास सुरवात केली. तें काव्यगायन इतकें उत्कृष्ट होतें कीं, पशुपक्षांना सुद्धां अन्नपाण्याची विस्मृति होऊन त्यांत ते तल्लीन होऊन गेले. त्यांचें अंगांत ताजें रक्त व मांस यांची उत्पत्ति होणें बंद झालें. ताजें मांस न मिळाल्यामुळें सप्तवाहन व त्याच्या दरबारच्या कांहीं लोकांस रोग जडला. वार्तिकानें रानांतील वर्तमान दरबारांत कळविलें. पशूपक्षी सुद्धां काव्यगायनावर इतके लुब्ध होतात, व आपण मानव असूनहि काव्याबद्दल एवढें औदासीन्य दाखवावें, याची सप्तवाहन व त्याच्या मानकऱ्यांस लज्जा वाटली ! सप्तवाहन आपल्या मानकऱ्यांसहित गुणाढ्याकडे गेला; व राहिलेलें काव्य त्यानें मोठ्या आदरानें आपल्या राजधानींत आणलें.

## मुख्य पात्रें

१. **सप्तवाहन** —— राजा.

२. **गुणाढ्य** —— महाकवि

३. **वीणादास** —— दरबारचा मानकरी ( काव्य-रसिक )

४. **नृशंस** —— ,, ,, ( काव्य-दूषक )

५. **मृणालिनी** } वनदेवता

६. **कादंबिनी** }

## गौण पात्रें

१. **वक्रदंत** —— राजाचा प्रधान

२. **मार्गण** —— दरबारचा मानकरी (काव्यभोक्ता)

३. **सुदाम** —— दरबारचा काव्य—टीकाकार

४. **खद्योत** —— राजकवि.

५. **खंजन** —— दरबारचा भाट

६. **आयुर्वेदशौंड**-- राजवैद्य

याशिवाय **वार्तिक**-( बातमीदार ) **पिशुनक, शलभ**, ( दरबारांतील इतर मानकरी ) इ. इ.

---

# काव्य—संन्यास

## एकांकी

### ( नाट्यकाव्य )

[ मुक्तछंद—अक्षरलेखा जगती ]

### — प्रवेश १ ला —

( नृशंस व वीणादास प्रवेश करतात. )

नृशंसः— अभिवादन मी करीं वीणादास
प्रभातींच कुठें ?

वीणादासः— राजगृहाप्रत.
उत्साह अंगचा जाई मावळून
जसजसें येई नृपाळ-भवन-
अष्टभोगांमाजीं जाहलासे दंग
सत्काव्य-विन्मुख तो सप्तवाहन !

नृशंसः— जाळायची कांहो कविता-राक्षसी ?
राज्यलक्ष्मीपुढें गमे क्षुद्र दासी !
काय भूपैश्वर्य दीपताती नेत्र १०
सिंहासन कसें खचलें रत्नांनीं
नाचती हांसती केतकी-कामिनी
नूपुरांचा चाले मंजु झणत्कार
स्वर्णचषकांत फेसाळे वारुणी
सोडूनियां असें सौख्याचें आगार

काव्याचें चिपाड चघळाया झाला
काय भूप मूर्ख ?

वीणादासः– बालिशता तुझी कितीक नृशंस !
सत्काव्य-कलिका तुजशी मूढाला।
कशी आकळावी रे ! अरसिकाला ? २०
उन्मनी ती दशा तिचा ब्रह्मानंद
कळणें कसचा 'जडभरता' ला ?

[ गुणाढ्य प्रवेश करतो ]

गुणाढ्यः– महोदयांनों ! हा घ्यावा नमस्कार
मी कवि गुणाढ्य.

नृशंसः– कोण हा आढ्य ?
दिसतो बावळा नसे कवि–कळा !

[ गुणाढ्य त्याच्याकडे विस्मितपणें पाहतो ]

वीणादासः– नमस्कृति कवे ! क्षेमकुशल ना ?
आज आनंदाचा उगवे सुदिन
हर्षाचा सोहळा आपुली ही भेट
ह्मणावें वैराण सहाऱ्यांत काय– ३०
भेटलां आह्मांला कलश–तरुंच ?

नृशंसः– [ कवीकडे पाहून ]
कोठें कविब्रुव ऐसे तांतडीनें ?

गुणाढ्यः– त्या सतवाहन भूमीपतीकडे
त्याच्या वांचोनियां कवितेचें कोड
पुरवील कोण ?

नृशंसः- ऐसें हें गबाळें पाहूनियां सांग
हास्याचे फवारे सोडतील सारे !
आणिक स्मिताच्या पडतील खळ्या
रमणीजनांच्या गमतीनें गालां !

वीणादासः- मूर्खशिरोमणे ! काय बाष्कळता ? ४०
हा कविश्रेष्ठांचा मूर्त अपमान

नृशंसः- कविश्रेष्ठ असे हा कीं कवि-कीट ?

वीणादासः- उद्धट ! उर्मट !!
आश्लेषा नक्षत्रीं कीटक-पाऊस
पडे जसा, तशीं पडतीं वचनें
याच्या मुखांतून अशिव अभद्र !

गुणाढ्यः- नृपवर माझें हें काव्य श्रवून
डोलवील मान

वीणादासः- नंदीबैलासम.
( स्वगत )

नृशंसः- डोलवील नच परी उडवील !! ५०

गुणाढ्यः- ऐकतां फुटेल पाझर पाषाणा
अंगच्या रक्तानें लिहिली कविता
सात लक्ष केली काव्याची रचना !

नृशंसः- काळाचा हा खून जाणूनबुजून !!
खडकावरीही वाढतें अभंड
जसें तृण तशी रूक्ष दरबारीं
काव्याची जाहली दिसते पैदास
जाहले कवीही पायली पन्नास !

(गातो)

काव्य कशाचें खुशालचंदा ?
उरला नच कां तुजला धंदा ? ६०
संपत्तीच्या मंजुळ नादा
भुलतें जग हें तुला कळेना
त्यांत जादु जी तुला दिसेना
वाया लागशि कविता-फंदा
पिसाटापरी जुळविशि छंदा
अकलेचा तूं गमगी कांदा !

[ हेटाळणीच्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहतो ]

वीणादासः- असे विदुषक हा कविदूषक !!
राजमंदिरातें चला पुढें कवे !
लक्ष नच देणें बडबडीकडे—

नृशंसः- मूर्ख हे बापडे !!! ७०

---

## -- प्रवेश २ रा --

( स्थळः- राजदरबार )

खंजनः- जयजयकार ! —
जयजयकार सप्तवाहनांचा
सत्ताधारी सारे ज्यापुढें वांकती
निनाद करिती विजयदुंदुभी
पसरे कीर्तीश्री विमल दिगंतीं
रत्नमणियांच्या राशी अंगावरी —

सप्तवाहनः- बंद करा आतां भाट-ललकारी !

वक्रदंतः- न्यायाअन्यायांचे राहिले अजून
निवाडे तुंबून
मानकरी करी गरिबाचा खून ८०
फुकट मदिरा देईना ह्मणून

सप्तवाहनः- असो; पाहूं पुढें!- कोठें त्या रमणी?
नृत्य झडूं द्यावें आतां याच क्षणीं!
साऱ्या येऊं द्याव्या हस्तिनी शंखिनी
आगोदर आणा चित्रिणी पद्मिनी
कांठोकांठ भरा पात्रांत वारुणी!!

[ नृत्यांगनांचा 'अर्धमुकुल' नाच सुरू होतो व मद्यार्कांचे पेले भराभर रिकामे होतात ]

वार्तिकः- महाराज! कवि सिंहद्वारापुढें! —

सप्तवाहनः- [ कपाळाला आंठ्या घालीत ]
काय हें सांकडें?! करा उपस्थित.

वीणादासः- राजराजेश्वर! येती कवीवर
द्यावें उत्थापन.

[ गुणाढ्य प्रवेश करतो ]

मार्गणः- वर्दी देई जसा सूर्यागमनाची
लुब्धक तारक
वीणादास शोभे पुरोगामी तसा
मागून शोभतो विश्वकवि थोर!
कृशमूर्ति जरी तपस्येचें तेज
रत्नकळिसम फांके देहावरी!

*

[ सप्तवाहन बेपर्वाईनें तसाच बसला असतो. त्याला जागृति आणण्यासाठीं ]

वीणादासः– काव्यसृष्टीचे हे येती विश्वामित्र
नृपा ! यथोचित करावा आदर !

सप्तवाहनः– कोण आगांतुक येई रानवट
अवाढव्य दिसें याचें काव्य-बाड ! १००

( सर्व मानकरी खो खो करून हांसतात )

सप्तवाहनः– कायरे यायाचें येथें प्रयोजन ?

गुणाढ्यः कवि मी गुणाढ्य राजाश्रया आलों
भूपाचीं भूषणें लक्ष्मी–सरस्वती
लक्ष्मीसी न तोटा भेटिसी आणिली
तिच्या रसवंती.

सप्तवाहनः– किती केला सांग काव्याचा प्रसव ?

गुणाढ्यः– सात लाख नृपा ! लिहियलें श्लोक

सप्तवाहनः– अबबबबव !! सात नाणीं जरी
कमाविता तरी जाहलें असतें
जन्माचें सार्थक ११०

वीणादासः– कलेचाही कसे बाजार मांडिती
( स्वगत ) पहा जडमती !
अव्यभिचारिणी उपासनेवीण
निर्माण होती कां कुठें काव्य-लेणीं ?
( उघड ) काव्य-कलावती अभिराम याची
नच साधारण
नवरस येथें करा जोडोनियां
पूजनार्थं सिद्ध ब्रह्मकुमरीच्या

कल्पना–भरारी भेदिते गगन

सप्तवाहनः– टाका जाळुनियां भिकारडें काव्य १२०

वीणादासः– ( त्याच्याकडे लक्ष न देतां )

गंगौघापरिस निर्मळ रसाळ

ऐकाहो सारेच रजयंती वाणी

आवेश प्रमोद क्रीडा करतात

झळाळे प्रतिभा अति दीप्तिमान

नृशंसः– मदिराक्षीसह मादक मदिरा

निःसत्व यांपुढें कर्कश ही गिरा

गुणाढ्यः– घेवोनियां श्रम लिहियलें काव्य

(सप्तवाहनास) स्वतःच्या रक्ताच्या शाईनें, अमोल

अंतःकरणाची खळबळ तीव्र

काव्याच्या मिषानें पडली बाहेर १३०

भव्य मान आली दुराप काव्यश्री

चोखाळीत मार्ग आपल्या आपण.

सप्तवाहनः– ह्ः ह्ः ह्ः रक्तानें लिहिलेस काव्य ?

हजारों वीरांचा चाले नरमेध

उसळती इथें रक्ताचीं कारंजीं

तसलेंच दृश्य पाहून आमचें

संतोषतें मन

वाटावी आह्मांला कशी हळहळ

खरडिलें जरी आपुलें तूं काव्य

काढून कांहींसे रुधिराचे बिंदू ? १४०

वाहवितों आह्मी शोणिताचे सिंधू !!

गुणाढ्यः- पैशाची भाषेंत ललित लिहिला
काव्यग्रंथ प्रौढ
पिशुनकः- पैशाची, पैशाची कविता पिश्याची !

( सर्व मानकरी दांत विचकतात ! )

वक्रदंतः- निवळशंख हा कोणी अकिंचन
वीणादासः- मानधन कवि संन्याशाचें वाण
(सप्तवाहनास) जरी घेई तरी याची ही श्रीमंती
खालीं पाहायला लावी कुबेराला !
निरुपम याचा ऐक वाग्विलास
बूज आणि करीं अशा सत्कवीची १५०
अमृताचा मेघ इकडे वोळला
जन ते करंटे धिःकारती याला
सोडोनी वाग्शर करणें न योग्य
तयाचें कोमल स्वांत-विदारण !
सुदामः- काव्यामाजी नसे याच्या लेश गोडी
करी खुळचट कांहींतरी खूळ
वीणादासः- ऐकिल्यावांचोनी प्रायः टीकाकार
देती अभिप्राय झोंकोनी मंदधी !
हजारांत एक रत्नपरीक्षक
काव्य समीक्षक तसाच विरळा १६०
सहृदयतेनें कलाकृतीकडे
पाहणारे असे टीकाकार थोडे
नरम दगड आंभोत्री सांपडे
कुठें एखादाच !!

शलभः- काव्य लिहिण्यांत किती केला वद
त्वां कालापव्यय ?

गुणाढ्यः- सात वर्षे केली उग्र तपश्चर्या
तेव्हां विद्यागौरी तुष्ट झाली आर्या !

पिशुनकः- दिनांत एकाच कविता अनंत
सलील लिहिती असे कितीकच १७०
राजाश्रयीं कवी पडले असंख्य
तुणतुणें येथें आपुलें लावून
स्वतःस, करिशी वृथा हास्यास्पद

(कवि खद्योताकडे दृष्टिक्षेप करीत)

केकूं द्या आपली कवे ! केकीश्वरी
उडवा प्रमत्त कवींची बंभेरी
दाखवा आपुलें या जडजंबाल !
होऊं द्या रसिक हे काव्यबंबाळ !!

खद्योतः- ( विक्षिप्त प्रकारचे हातवारे करीत )

घटतटपट विटसुट करि हरित कोटिका
अवकाशीं खुट भरते चंडचंडिका
विहरत रत तरत तरण हंसकननिका १८०
नभि नंदीदिप दिपत छपत मंजुमदनिका

( सर्व सभासद बेफाम टाळ्या पिटतात )

सभासदः- का का का ! वाहवा ! वाहवा ! सुंदर
यमकांची श्रेणी करी गारीगार
गाऊनी गायन करितो बहार

सुदामः- देतों मी प्रदीर्घ प्रशस्ती-पत्रक
असें कीं पाहून तें भरभक्कम
नमेल निंदक कोणीही उद्दाम
काव्यामाजी चुका काढी जो मुद्दाम !
भूल पाडणारी श्रोत्रद्वया चाल
पदलालित्याची जहाली कमाल ! १९०
आज्ञा देतों मी कीं, काव्य शिलास्तंभीं
काढावें कोरून.

वीणादासः- गुणाढ्य तेजाळ भासतो भास्कर
कवि खद्योत हा त्यापुढें खद्योत
वाशिल्यांची तट्टे दिसतीं अनेक
यमकांच्या पाशीं कविता-हरिणी
अहह ! व्याकुळ झाली जखडुनी
अर्थांचा जाहला पुराच बेपत्ता !

( सर्वांकडे पहात )

सारें बरें परी कोठें लुप्त अर्थ ?

पिशुनकः- इतुका सरळ नच येई ध्यानीं ? २००
रे मूढ ! नसे कां हें गूढगुंजन ?!
वरून कांहीं न परी विकसतें
आंऽऽऽत अर्थब्रह्म !!!

वक्रदंतः- पुराणे कवी तेऽऽ काव्य-मतंगज
काय त्यांचें काव्य अहा ! प्रासादिक
चक्रबंध तसे जाडे ते प्रबंध
समजायाची ही पडे मारामार !

(सुस्कारा सोडून) गेलें! आतां काय राहियलें. जुनें ?
होणें नच कधीं तसे या काळांत !!
पिशुनकः- आजचे हे कवी त्यांपुढें मषक २१०
रडताती सारे स्त्रैण रंडागीत !!
वीणादासः- कडुनिंब वृक्षा* त्याचे नवेपणीं
पुसतें न कोणी
घठतसे जेव्हां होउनियां जीर्ण
तदाच त्या चढे चंदनाचें मोल !!
केवळ जुनाट ह्मणून करिती
लोक त्या वंदन !
मार्गणः- जीवंतपणीं ते कविवर्यांचीही
करिती अवज्ञा
मेल्यावरी परी माजविती त्यांच्या २२०
गुणांचे देव्हारे
दर्शनीय त्यांची बांधून स्मारकें
स्तुतिस्तोत्रांचेहि वाहविती पूर !!
सत्ववाहनः- असें काय काव्यीं सांठविलें तरी
सर्वस्वाचा होम करावा त्यासाठीं ?
वीणादासः- महिमान तुज कसें न कळतें—
कलापीश्वरीचें !

---

* कडूलिंबाचा वृक्ष फार जुना झाला ह्मणजे त्याच्या मुळांस व खोडांस चंदनाप्रमाणें वास येऊं लागतो; व लबाड व्यापाऱ्यांकडून तीं चंदनाच्या मोलानें विकलीं जातात.

कराळ दाढेंत काळाच्या जरी
होई लुप्त अंतीं सारा विश्वकोष
घालवून मात राहते अमर २३०
एक वागीश्वरी मात्र काळावर
फडशा पाडील तुझा कालसर्प
उमरावांसह ऐटींत तूं जरी
परी वाङ्मोहिनी घालुनियां त्याला
गुंगवील नादीं अशी कोण शक्ति ?
गुणाढ्य कवीची एक वीणावती !!

सप्तवाहनः– आटोप आपुलें रे ! चंबूगवाळें
कविश्रेष्ठ हा न परी कपिश्रेष्ठ

गुणाढ्यः– कसोटी नको रे ! सौम्यतेची पाहूं
आमुची शांतता कर्पूरासमान २४०
शीतल जोंवरी नच अग्निस्पर्श
तेजोभंगाचा न लावी अग्निकण !!

वीणादासः– धिःकार भूपाला ! शतधा धिक्कार
मदाचें काविरें तव नेत्रीं भरे
म्हणून कळे न कवीकृति तुला
ही कौतुकास्पद !!

[ गुणाढ्य व वीणादास रागानें निघून जातात व दरबारचे मानकरी पुन्हां नाचरंगांत दंग होतात ]

---

## — प्रवेश ३ रा —

( स्थळः— वन )

[ गुणाढ्य अग्निकुंड सिध्द करून बसला आहे ]

गुणाढ्यः— अग्निदेवा ! तुला मम ही आत्मजा
अर्पण करितों अशा घातवेळीं
अवमानिता ही रुचे न ठेवणें —
याहून बरवी तुजला आहुति ! २५०

[ काव्यग्रंथाकडे पहात गहिंवरून ]

आकाशवेलीचें* भूमीवरी मूळ
कसें उगवेल ? कसें वा तगेल ?
कविता — किशोरी हीही नच तशी
मर्त्य लोकांतील
शापित ही कुणी यक्षकन्यकाच
अवतरतसे इथें अवचित
नगरींत वस्से ! म्हणुनियां जाई
आपुल्या अद्भुत !

[ गायन करीत एक एक भूर्जपत्र अग्नींत टाकतो ]

### ( सरस्वती—गीत )

[ चालः— स्त्रीगीताची ]

**कल्पलता जगांतून करी गमन**
**करूं तिचें अत्यादरें आतां पूजन ! ॥धृ०॥**

---

* कंथिनीलता हिचें मूळ भूमिवरीत उगवत नाहीं; तें अधांतरीच असतें !

चित्रकाराची कुंचली
वागीशाची गीतावली
समर्थ न करायला तिचें वर्णन १.

गायकाची रागदारी
वाचस्पतीची भरारी
वर्णतांना अडखळे होऊन दीन २.

चराचर होतां सुप्त
चैतन्य ती वितरीत
ज्ञानवल्ली; हिजपुढें परेश लीन ३.

निरुत्साही सृष्टीराणी
जीवकला तीतें आणी
वारंवार करूनियां वीणावादन ४.

अथांग तो रत्नाकर
मूर्तीमंत वैरागर
त्याच्याहूनिही अनर्घ्य-रत्न- निधान ५.

नवलाख, विभावरी
रत्नें धरिते अंतरीं
परी वागीश्वरी सरी तिला कोठून ? ६.

अल्पजीवी वस्तुजात
त्यास करिते शाश्वत
आयुष्यास गोडी आणी नित्य नूतन !! ७.

भग्न जिवाला द्यायाला —
विस्मृतीचा विरंगुळा
कलावती वांचोनियां कुणी न अन्य !!! ८.

[ एकीकडून मृणालिनी, कादंबिनी व दुसरीकडून रागरागिण्या, ऋषभ, गांधार षड्ज इ० सप्तसूर व पशूपक्षीगण इत्यादि प्रवेश करतात. ]

मृणालिनी } कविराज कोण गाऊन गायन
कादंबिनी } टाकितो भारून जादूनें विपिन ?

मृणालिनीः— बाई, कादंबिनी ! ऐशा अवसरीं
ऐकून गीतक मलयानिलच —
वाटतें वाहतो मदंगावरून

कादंबिनीः— अगई ! वाटतें थांबलें गायन २९०
चल जाऊं गडे कविरायाकडे
आळवणी करूं ' गातच रहावें
आपुलें सत्काव्य कवे ! दीर्घकाल '

[ गुणाढ्याजवळ येतात ]

गुणाढ्यः— पेटला प्रचंड अग्निनारायण
कवितानंदिनी देतों त्यासी दान
किती मी निर्घृण !

कादंबिनीः— हां हां कविदेव ! चालविलें काय ?
नवनीतासम शारदा कोमला
शीतल उटीही सहते न तिला
अग्निभक्षणार्थ योजिता निश्चित ३००
निर्दयतेची ही झाली परिसीमा !

मृणालिनीः— मृदुल पुष्पांची शय्याही असती
बोंचली तिजला कंटकासमान
हाय ! चितेवरी ऐशा या तन्वीला
ठेवतांना कसे झालांत पाषाण ?

गुणाढ्यः- सृष्टि उफराटी झाली ह्मणुनियां
जाहलें सत्काव्य जगीं मातीमोल

कादंबिनीः- अभिजात काव्य- त्याची अभिरुची
सहसा नसते जनासी सामान्य
अफूवरतीच कित्येक कीटक ३१०
जगती जीवन !
ह्मणून कवीही होतात निर्माते
काव्यांचे चटोर
आणि बनताती प्रवाह-पतित !
सारे जलचर सरिता-धारेंत
ओघानुसारच करतात क्रीडा
आपल्यासारखा रससिद्ध कवि-
प्रवाहाविरुद्ध मार्ग काढणार
मत्स्यासम दिसे कुणी क्वचितच !!

मृणालिनीः- पण या जगांत कुणीतरी जीव ३२०
भाग्यवान असा असेल आतुर
मंजु कवितेचे ऐकण्याला सूर
वाजवितो कान्हा यमुनेच्या तीरीं
मंजुळ बासरी तिलाही न सरी
वाटते काव्याची आपुल्या अनन्य
हृदयीं उठतें सुख-संवेदन !!

[ गुणाढ्य एक भूर्जपत्र अग्नींत टाकतो ]

मृणालिनीः- हृदय फाटतें हें दृश्य बघतां
आवरतें श्याना आतां कवीश्वरा !
थांबवा आपली पाशवी क्रूरता !

कादंबिनीः– अनुचित कवे! आपुलें वर्तन ३३०
कलंकास्पद हें धवल कीर्तीला
गुणाढ्यः– उचितानुचित कापट्य ऋजुता
उरती न कांहीं भेदाभेद आतां!
शारदामूर्तीचा अघोर भंजक
अरसिकाग्रणी त्याला उच्चस्थान
निःसीम भजक जरी वीणादास
जळजळणारा अधिपकोपाग्नि
वर्षे त्याच्या भालीं!!
मृणालिनीः– बाई, कादंबिनी! हळव्या मनाच्या
कवीचें किती ग! हें परिवर्तन? ३४०
महाळुंग–आम्ल* विरघळुनियां
कठीणही जसें टाकितें पोलाद
व्यावहारिकता उपयोगवाद
भंगून टाकिती कवी–सम्राटाचें
स्थितप्रज्ञ मन!
गुणाढ्यः– केले परिश्रम दीर्घ अनलस
किती करावया कवितावर्धन
सदस्यांनीं केली नित्य हेटाळणी
पतिता नर्तकी हांसल्या मुखासी
अंचल लावुनी! ३५०

[ एक भली मोठी भूर्जपत्रांची चळत घेऊन अग्नींत टाकतो. मृणालिनी व कादंबिनी अश्रू ढाळतात. ]

गुणाढ्यः– वनदेवतांनों! कां हा अश्रूपात?

---

* तेजाब ( ॲसिड )

थांबवितों माझें कृत्य भयानक
कवितेकारणीं आटविलें रक्त
पण आलें त्याचें फळ ‘ उपेक्षण ’
त्यानें केलें मला निष्ठुरहृदय
यास्तव देवींनो करा मला क्षमा

[ मृणालिनी व कादंबिनी अश्रू आवरतात. ]

गुणाढ्यः– [ जळलेल्या भूर्जपत्रांकडे पहात शोक करतो. ]
वृथा तुला दिलें लडिवाळे बाळे
तप्त अग्निमुखीं गोमटे वेल्हाळे !
धेनुकाच घात वासरीचा करी
पाडस मीं माझें पोळलें पावकीं ! ३६०
वत्से ! आतां तुज कोठें पाहूं तरी ?
पुरवावें ज्यांनीं कीं, कोडकौतुक
तोच झाला हाय ! निर्दय खाटीक !

मृणालिनी } कादंबिनी } झालेलें कधींही न ये परतोनी
चालेल जगाचें कैसें वैतागोनी ?

मृणालिनी.– नका गडे ! करूं असे कविराय !
भडभडून ये आमुच्या अंतरीं
‘ आनंदी आनंद ’ भीषण सृष्टींत
पसरणें ह्याच कवित्वाचा हेत
अणुरेणूमाजी रसरसलेलें ३७०
सुंदरता–सार कविता देवीनें
दाखविणें तिचें उदात्त हें ध्येय
काव्य विश्रामाचें केलि–निकेतन !

कादंबिनीः— गतकालांतील जी रोमहर्षण—
प्रसंगां देतसे नवीन उजाळा
भाविकालांतलि उज्ज्वलता रम्य
उभी करितसे मनश्चक्षूंपुढें
आत्मोन्नती-धडे देई मानवांस
अंतर्भेदी दृष्टि जिची शोधितसे—
ब्रह्मांडांमधील निगूढ रहस्य ३८०
तिला ह्मणतात स्फूर्ति, कल्पलता
वा तीच प्रतिभा!
आणखी कवि हा तिचा जनकच
तोच झाला लव जरी शोकक्कान्त
उर्ज्वस्वलतेचा होतो तरी अंत!!
मृणालिनीः— ऐकवा आह्मांला आतां शुभगान
कवि एकमेव दिसतां आपण
आपल्यास असो आमुचा प्रणाम!
गुणाढ्यः— वनदेवतांनों कवि कोण खरा
विशाल दृष्टीनें पहा तरी जरा!! ३९०

( गीत गातो )

[ चालः— दोह्याप्रमाणें ]

तत्वद्रष्टा कोण बरें प्रतिभावंत कवीश?
हुकमत साऱ्या रसांवरी, एकच तो जगदीश
काव्य तयाचें हें असे मूर्तिमंत ब्रह्मांड
त्यामधलें हें जग अवुलें ह्मणजे 'सुंदरकांड'!
त्यानें वेधक निर्मिला रमणीजनसंभार
तया मिषातें करि लीला रस नामें शृंगार

सहन न होई वाटतें ज्यांना यौवनभार
गाजवि सत्ता, बलशाली या अस्त्रानें मार !
विलोलनयना पाहुनी स्फुरती मनिं सारंग
योग्यांचीही त्यां बघतां होइ समाधी भंग ४००
सहजासहजी बनवीती मनुजा पदिंचा दास
नयनमनोरम दावुनी अपुले मुग्ध विलास !
कलावंत तो खराखुरा निसर्गवर्णनकार
रम्य तयाच्या वर्णना कसा असावा पार ?
पर्वत त्यानें उभवीले गभीर आणिक तुंग
गिरीगिरींचे मढवीले नानारंगीं शृंग
त्यानें सुंदर काढिली गगनाची महिराप
शशिसह करिती तारका तेथें प्रेमालाप
एकसरीनें लागलीं पुष्पें हीं दळदार
मधुकर लुटतो गुंगुनी त्यांचा मुक्तबहार ! ४१०
विहार करतो लहरीनें केव्हां कुंजि-निकुंजीं
मन मानेतों घालतो फुलांफुलांवर रुंजी !
हास्यरसाला ये भरती पाहुनि मूढां मंद
गबाळरूपा पाहुनी लुटिती जन आनंद
दुडदुड धाउनि खेळतें सोनुकलें लडिवाळ
काढी बोलहि बोबडे गोजिरवाणें बाळ
बालिश लीला पाहुनी पिता पुरवितो कोड
श्रम वाराया आलेखी वत्सलरस कां गोड ?
संगरभूमी निर्मुनी रक्तें माखी लाल
वीररसाचा नमुना तो दावी काय कराल ? ४२०

दुर्दैवाचा करूनियां कुणावरी तरि वार
करुण दावितो लावूनी नेत्रां अश्रूधार
मधुनी मधुनी तो उठवी भैरव सिंधु-तुफान
भयानकाला पाहुनी अंगीं नुरतें त्राण
ओहळ-खळखळ भासते काव्यामधला नाद
संतोषाला तुटी नसे घेतां त्याचा स्वाद !

कादंबिनीः- अल्लड पांखरें गीतकाच्या स्वरें
नादलुब्ध होती तादात्म्य होऊन
हरपवी गीत पशूंचेही भान
काव्यकोविदाची कविता-स्रवंती ४३०
वाटे झरणारी अमृत, चंद्राची—
कीं सतरावीच तेजोमय कळा !!

मृणालिनीः- डोले वासंतिका गाइ निळावंती
निर्झर भ्रमती देउनियां सूर
रानफुलें सारीं बागडतीं मोदें
प्रफुल्ल वल्लरी होती कुसुमित !

## — प्रवेश ४ था —

( स्थळः— राजदरबार )

वक्रदंतः- नरपाल आतां होतात प्रविष्ट
कार्य करण्याला नसती समर्थ

[ सप्तवाहन प्रवेश करतो. सर्वजण उठून उभे राहतात ]

संजमः- राहो निरामय हा सप्तवाहन
प्रतापाचा असे जणुं मेरुमणी ४४०

समरपंडित उदाराग्रणीही
सामर्थ्य जयाचें अतुल अतर्क्य—

सप्तवाहनः– थांबवा हें मौरर्च्य !!
( मध्येंच )

वक्रदंतः– असतांना आह्मी सारे सुखासनि
त्रस्त करी आह्मां असा रोग कोण ?

शलभः– राजवैद्यालाही होईना निदान
विचित्र जाहला रोग हा नवीन

सप्तवाहनः– जळो वैद्यशास्त्र ज्यांत न चिकित्सा
अशा भयंकर आमयाची कुठें

वक्रदंतः– आयुर्वेदमणे ! वैद्यपंचानना ! ४५०
काय छळितसे रोग या जनांना ?
काढा मात्रा भस्में करा भस्मीभूत
आयुर्वेदशौंडा रोगाचें हें भूत !!

पिशुनकः– स्वर्गवासी रोगी जाहल्यावांचून
कसेहो रोगाचें वैद्या व्हावें ज्ञान ?!

[ सर्व सभासदांच्या चर्येवर हास्याची रेषा पसरते; सप्तवाहन मध्येंच विवळतो ]

सप्तवाहनः– संतप्त जाहली अयाई ग ! गात्रें
थोडकाही नसे हे राम ! आराम

पिशुनकः– घोकोनियां राम कुणाला आराम ?
संप्रती त्यामाजी उरे काय राम ?
घोकिती मानव प्रभातीं निशीथीं ४६०
भूतें भिवबितां कातरवेळींही

धावेना आळशी परी मेघश्याम
पर्वा न ह्मणाला जरी भक्त राम !!

[ दूत प्रवेश करतो ]

वार्तिकः- आश्चर्य अमित ऐका शद्बातीत !

[ त्याच्याकडे सगळेजण आश्चर्यानें पाहतात ]

गिरिपरिसरीं एक कवीश्वर
यज्ञकुंड करी सिद्ध, दे आहुति
आलापी गायन हंसताहे वन
खिदळती तिथें स्फटिक-निर्झर
वंशततींतून वायु धरी सूर—

वक्रदंतः- कासया लांबण ? ४७०

वार्तिकः- हत्तीसम शिला प्रचंड भोंवतीं
दुधाळ फेसाळ सोडिती प्रपात
जणूं सोंडेंतून, ती नवलपरीच !—

सह्यवाहनः- यासहि झळंबे वाटे काव्य-भूत !!!
फार लांबलेली दिसते जिभली
केलें नच जर वाजवी भाषण—
जाईल छाटली !!

वार्तिकः- पशू पक्षी झाले गायनीं तन्मय
( भानावर येऊन ) वर्ज्य केलें त्यांनीं सारें अन्नपान

[ राजा व मानकरी डोळे विस्फारतात. ]

सह्यवाहनः- जिवंत असतां आह्मी सिंहासनीं ४८०
धजतो कराया कोण काव्यगान ?!

वार्तिकः- कवि तो गुणाढ्य, काढी कलालाप

ऐकून करिती पशू आणि पक्षी
—चराचर सर्व–काव्यलीलोत्सव !
काव्यामृत पिती रसास्वाद घेती
अहाहा ! अहाहा ! मौजच मौज ती !
कृषिदेवी तिथें निश्चल जाहली
निसर्ग देवता— तीही वेडावली !
वनविहारिणी नगरवासिनी
आकृष्ट जाहल्या तेथें विलोभोनी 	४९०
रोमांचलें अंग माझेंही सूरांनीं
स्वभावतःच मी जरी अरसिक
स्त्रवूं लागती हे बोल काव्यात्मक !

आयुर्वेदशौंडः–कारण रोगाचें आलें माझ्या ध्यानीं
(एकदम्) 	पशूपक्षी जर कांहीं नच खाती
कोठूनियां त्यांत व्हावी मग सांगा
मांसाची उत्पत्ति ?
केवळ खाउनी कोण जगे अस्थि ?

वार्तिकः– 	ऐकावें वचन देउनियां कान
दवडली संधी सोन्याची हांतून 	५००
म्लेंच्छही* पूजीती सरस्वती–मूर्ति
हाडाचे असून आह्मी हिंदू परी
करून राहिलों तिची विटंबना !

सप्तवाहनः– कोण हा उद्दाम ? आह्मां शिकवितो

---

* कांहीं यवन नरेश सरस्वती–मूर्ति आपल्या दरबारांत स्थापन करून पूजीत असत, असे इतिहासांत दाखले आहेत.

शुष्क तत्वज्ञान ? दावितो पांडित्य
मदोन्मत्त भृत्य !!

**सर्व मानकरीः**–काव्यडोहीं आम्हां करणें विहार
( एकाएकी ) उठाउठी चला आतां नको वेळ
पशूही करिती सहर्ष मज्जन
काव्यगंगेमाजी ऐशा न क्रीडणें ५१०
आह्मी मानवांनीं कोणतें दुसरें
याहून लांच्छन ?

**सप्तवाहनः**– भिकारडा कवी, काय त्याचें काव्य !
आरामशीर हीं उद्यानें महाल
सोडूनियां रानीं जाणें मूढपण
कपिश्रेष्ठाची त्या उडवा गर्दन !!

**मार्गणः**– राहूं देईं राजा तुझा उपदेश
निपटारे नच आह्मी म्लेंच्छाहून
आणि पशूहून
अतःपर नसे इच्छा कंठण्याची ५२०
नीरस जीवित
स्वयंप्रकाशिनी प्रभावशालिनी—
सर्वव्यापिनीची बांधली जाईना
जेथें पूजा तेथें रुचेना राहणें
कितीही असला देश तो विख्यात

[ सर्व मानकऱ्यांकडे वळून ]
पशू ह्मणुनियां तुह्मी याउपरी
राहणार किंवा होणार मानव ?

**सर्व मानकरीः**–पशू, पशू, पशू–काय ही पदवी
झुगारा जोखड चलाच त्या स्थळीं

नृशंसः- सर्वांची फिरली टाळकीं; आपण ५३०
( स्वगत ) ' रसिकप्रवर ' करावा बहाणा
( मोठ्यानें उघड ) पशू तो, न ज्यातें कळे काव्यगोष्टी !
मार्गणः- दुरात्म्या ! करितो धडावेगळेंची
तुझें नीच शीर्ष
नाशाला कारण बिचाऱ्या कवीच्या
तूंच दुष्ट खल

[ तरवार उपसतो; दुसरे त्याला धरून ठेवतात. ]

वार्तिकः- कर्णरंध्रीं घुमे प्रत्येक तो सूर
सौख्याचें शिखर देई मिळवूनी
शलभः- इतुकें कां असें काव्य आकर्षक ?
वार्तिकः- शपथपूर्वक कस्तुरी-सौरभ ५४०
सांगतां येईना; वाटे घेणें योग्य
स्वतःच आस्वाद

[ जातात ]

---

## — प्रवेश ५ वा —

[ स्थळः— पहिलेंच वन ]

कादंबिनीः- रंगांत आलें ग ! कवीचें गायन
मंत्रमुग्ध झालें सारेच विजन
मोक्ष सांग ताई ! कोणता निराळा ?
विरस मालिन्य आधिव्याधी ताप—
काव्यरसीं झालीं नाहिशीं बुडुमी
आणि एकमात्र उरला आनंद !
मृणालिनीः- हताश हृदया देई संजीवन
मोहरून टाकी मनास कवन ५५०

सात्विक भावांना फुटला फुलोर
पांगुळे त्या वाणी कराया कथन
कादंबिनी:- विधिसृष्टीपेक्षां काव्यसृष्टि मये !
किति सुरवाड
येथें स्वतंत्रता तृप्ति समाधान

[ सप्तवाहन, त्याचे मानकरी इ० प्रवेश करतात. ]

सप्तवाहनः- कळे ना पुरती जरी काव्यगोडी
तरी या लकेरी आणि हें मार्दव
सारे अभिनव !!
( गुणाढ्यास ) कृतापराधी मी घ्यावें पदरांत
अगरु वृक्षातें मानिला कण्हेर ५६०
दावित असतां स्वर्गाचा सोपान
मूढें आचरिला निरयाचा मार्ग
सप्तवाहनः- कासया व्यर्थच आतां पश्चात्ताप ?
होऊनियां गेलें हातीं न ये पुन्हां
सहालक्ष ग्रंथ झाला अग्निसात
राहियला थोडा आतां लक्ष एक
भक्ष्य त्याचें देतों आतां मी ज्वलना !
राजा व इतरः—तुम्हांस विनंति करावी करुणा
( घाईने ) अक्षय ललाम अशी ही कविता
इतुकी राहिली तरी शांतवील ५७०
पोळलीं हृदयें; आणि वाढवील
अम्लान सौंदर्य !
मार्गणः- राहिला अंकुर वसुधारमण—
करील तयाचें आस्थेनें जतन
होईल तयाचें पुनर्विकसन !

सर्वजनः– स्मृती–मंजूषेंत ठेविलें राखून
वितरावें आम्हां कवीश्वरा रत्न
सप्तवाहनः– सुरीराज ! यावे मम सदनाला
असोशी न पुरे काव्य ऐकण्याची
कराया मी झालों आपुलें स्वागत ५८०
अतीव उत्सुक
गुणाढ्यः– निमाला प्रक्षोभ जरी केली क्षमा
जळतें अंतर तडके काळिज
कसाई होउनी कापिली कन्यका
यावीणें पातक निषिद्ध अन्य कां ?
हृदयाची धग शांत न होणार
रानोमाळ आतां असा हिंडणार
निराश्रित बाला केलीं मी स्वाधीन
घालावी तीवर मायेची पाखर !!

[ एकदम् निघून जातो ]

सर्वजनः– गेले कविवर हा हंत ! हा हंत ! ५९०
तोडून निःशेष सारे अनुबंध
सप्तवाहनः– मोठ्या आदरानें मम राजगृहा
घेवोनियां चला श्वेतपद्मासना
हृदयराउळीं स्थापुनियां मूर्ति
जयगीतें म्हणा !
मंगल तोरणें गुढया उभारून
महोत्सव करा प्रसन्न चित्तांनीं
सकल कलांची येई अधिष्ठात्री
मयूरवाहना आपुल्या गेहाला
निस्तुल पातला असा आज योग ६००

तिच्या सन्मानार्थ झडूं द्यावा आंता
वाद्यझणत्कार श्रवण-सुभग !
पुष्पें उधळावीं सुगंधी सुरंगी
छत्र धरायला पाचारा पावन
निसर्ग सुंदरी
कलामूर्ती साऱ्या आमंत्रुनी सांगा
वाराया चामरें महाराज्ञीवरी !
स्तोत्रें गावयाला विमुक्त कंठांनीं
वीणादासासम मार्मिक रसिक
राजधानीमाजीं आणा टाकोटाक ११०
पवाड भिडवा तिचा दिगंतरीं !
विभवलक्ष्मीला करायला लावा
पद संवाहन—बनवा किंकरी
क्रूर विषधर नृशंसासमान—
करा येथोनियां त्याचें उच्चाटन
घोंगावणी नको राजस राणिच्या—
भोंवतीं भूताची असल्या भीषण !!
सर्वजण:- काव्यदेवीसी हें योग्य उपायन !!! ११८

[ पडदा ]

---

# मूकस्तव

—0—

[ जातिः— नीरांजन ]

१.

दह्यादुधांनीं घातलें स्नान अभ्यंग, मूर्तीला
घमघमाट धूपाचा मंदिरांत त्या चालला

गजरे नी हारतुरे
सुमनांच्या माळा किती
बुक्का, गुलाल कुंकुम
भक्तगण उधळिती
निनादाचा होई तेथें
मग एकच कल्लोळ
गर्जताती थोर रवें
झांज, मृदंग नी टाळ
लखलख नीरांजन
त्याच्यावरी लक्ष वाती
ओवाळिती भक्तगण
मूर्तीवरी शेजारती !
गाभाऱ्यांत नंदादीप
धडधड जळताहे
रत्नखचित मुकुट
तेजाळ तो शोभताहे
मूर्तीभोंवतीं लोटली
भाविकांची ही झिंमड
रूप तिचें कोणालाही
तींतूनी न दिसे धड
घणघण घंटा वाजे
सिंहद्वारीं केव्हांची ही
परी परेश मूर्तीला
यत्किंचित जाग नाहीं !!

२.

जीव इकडे बैसला
त्याचा चाले मूकस्तव
काय करितो बिचारा
कोणालाही न जाणीव
उपचार त्याचेपाशीं
पूजेचा तो एकही न
दिसे वरून जगाला
कोणी क्षुद्र हीन दीन
कोंदटला घन तम
त्याचे भोंवतीं भीषण
तेजकल्लोळ हृदयीं
त्याच्या फांकलासे पण !
पाषाणाच्या पोटीं जैसा
झुळझुळ वाहे झरा
तसा जिवंत जिव्हाळा
त्याच्या हृदीं राहे खरा
दिव्यदृष्टि कृपाछत्र
त्याचे शिर्षावरी राही
त्याच्या पाहावया हिता
परात्परा झोंप नाहीं !!

*

# आर्तनाद

—0—

[ वृत्तः— शा. वि. ]

कर्जामाजि बुडूनियां अजवरी गेलों किती आपण
सर्वांनीं उपहांसुनी गणियले कीं आपणांसी तृण !
झाले कष्ट महा अनेक विपदा येऊनियां दारुण
कोणाला चुकलें भवीं मरण या, वा जाहलेलें ऋण ?

एकामागुन एक साल पडलें वाईट, शेती बसे
धंद्यामाजि कळा मुळीं न उरुनी अंधार सारा दिसे !
मृत्यूवांचुनि आपणांस नुरला कोठें दुजा आसरा
तोहि कांहिं दया न दावि भलत्या वेळीं चुकूनी जरा !

बाळें हीं चिमणीं, तया न कधिंही सुग्रास गे ! लाभला
वस्त्रें होउन लक्तरें; बहुपरी हा जीव भारावला
आशा कोळपती, मनोरथ तसे जाती विरोनी मनीं
सौख्याचा कण एकही न दिसतो आतांतरी जीवनीं

येई ना कणवा कुणास; कुणिही ऐके न आर्तस्वर
दीनांचा दुबळ्या असेंच गमतें कीं झोंपला ईश्वर !!

---

# सारंग

—0—

[ वृत्तः— सारंग ]

कारुण्य आटे तुझें सर्व पाहून
अश्रूसरी येति डोळ्यांत धावून

झालों अती दीन मी दुःख साहून
तूं हांससी मात्र राहून राहून ! १

ना सोसवे यापुढें तीव्र हा काच
आटोप तूझे अती तीक्ष्ण नाराच !
कां पाठिशिं लागशी बांधुनी चंग
व्याधा असे मीच कां एक सारंग ? २

देहीं मुळींही नुरतां अतां त्राण
तूझ्याविणें कोण येथें परित्राण
तूंची असें साधणें बाण-संधान
शोभे तुला काय हें मानसीं आण ! ३

---

## देहपात !

——0——

( " फांसेपारध " या खंडकाव्यातून )

[ चाल:— गर्द सभोतीं रान ]

पति दुर्व्यसनी होता त्याची वृत्ती अति मधुकरी
आस्वादाला कसेंहि चालें पुष्प त्यास लवभरी !
कुणी ' फुलझडी ' घेउन झाला पसार एके दिनीं
निराश्रीत ती साध्वी गेली एकाकी होउनी
घरें पडूनी हृदयीं पेटे प्रदीप्त वडवानल
प्राण द्यायचा विचार चाले तन्मानसिं चंचल
दुःखी जीवा कोण सखा तरि मृत्यूच्यावांचुन ?
शेवट करितो चिंतांचा तो वत्सलता दावुन !!

* * *

पसरित होती पंख आपुले रजनी घनकाजळी
कर्कश शद्वा काढित होती रातकीटकावली !
चराचराला निद्राबाई झोंपवि अंकावरी
शांत जाहलें; पर्णहि कोठें हालेना लवभरी
पदें उचलुनी झटपट जाई नदीकडे तांतडी
उठे शहारा अंगावरती, थरथर करते कुडी
संथ वाहतें जल हरिणीचें, शून्यमयी शांतता-
जणूं पांघरुन झोंप घेतसे वाटे जलदेवता !
तुफान दर्यामधिं हेलावे तारूं खाई जसें
विचारसागरिं तन्मनही घे गिरक्या गिरक्या तसें
गत काळाचे प्रसंग सरती झरझर दृष्टीपुढें
चिता भडकल्या दिसुनी येती तिजला चोंहीकडे
—बाळा दिसलें चित्र त्यांतले ऊस आणि अननसें
घ्याया त्याची धडपड चाले— दृश्य पाहतां तसें
येई हुंदका अनावर तिला पिळवटुनी अंतरीं
प्रसंग जणुं तो कालच घडला वाटे तिजला तरी
"दुर्दैवा ! तूं रक्त न शोषी जळवेसम कणकण
परी अजगरा सदृश टाकी गिळुनी मजलागुन ! —"
ह्मणून ऐसें कवटाळाया जाई मृत्यूग्रस्त
तदाच कोणी हात खेंचुनी करि तिजला हर्कत !

* * *

जागी झाली दचकुन तेव्हां अपुल्या तंद्रींतुन
शब्द निघाले: "कोण वैरि हा घे दावा साधुन ?"
"दावेदार न; आहे पण मी जन्माचा सोबती

जरा करावा विवेक, अपुली चळूं न द्यावी मती ”
“ थांबा! थांबा! नाहक आतां नका मला आवरूं
जगास विटलें मानस पुरतें; द्याच सुखानें मरूं !
बहुं बरवें तें जरी सुराही जाइ उरा भेदुन
जननिंदेचे प्रलाप शतपट त्याहुन अति दारुण ”
“ उपकाराचे माझ्या आहे ओझें तुमच्यावर
तया फेडण्या मोलाचें हें म्हणणें ऐका तर !
जगांत असती दुर्जन काळच, लोकांचे सज्जन
क्रौर्य दावुनी छळिती त्यांना डोईजड होउन
लावण्याची कळा असो कुणि अनन्यसाधारण
खलजिव्हा परि तिचेंहि करिते कटु छिद्रान्वेषण !
खाण्याचा जणुं पदार्थ समजुनि मृदुमृदु गुंजाफळ
टोंचे मारिति निर्दयतेनें पक्षी त्या निष्फळ
कठिण पाहुनी दगडासम त्या देती मग टाकुन
करा म्हणुनियां पाषाणापरि घट्ट आपुलें मन !
उन्हाळ्यामधीं गंगामाई फोंफाउन जातसे
संकटकाळिंहि खडतर यावें धैर्य तुम्हाला तसें !!
वनस्पती कुणि, वायु विषारी शोषिति जगतांतिल
अन् अंगांमधुनी वायु सोडिती शुद्ध असा निर्मल
निखाऱ्यावरी ऊद फेकिते हांसुन जग निर्गुण
सुवास सोडी हांसत तो तई कोनाकोनीं पण !!
ऋजुस्वभावी सज्जन ऐसे थोडेतरि पाहुन
कष्टमय जरी वाटे तरिही जगावेंच जीवन !!
देहलता ही मृदुल गोजिरी आत्म्याचें मंदिर
देहपात हा पुण्य नव्हे पण पापाचा डोंगर

—आणि धाकुटा प्रकाश शोभवि तुमचा जो कटितट
( चोंचहि नाहीं लाल जाहली, गमे असा पोपट ! )
नाहींसा त्या होतां जगतीं मातेचा कोंवसा
कठोर जगतीं टिकेल सांगा कोमल तंतू कसा ? "

*   *   *

काळजास हें भाषण गेलें आरपार भेदुन
मुकाट वळवी पदें मागुती हरिणीतीराहुन !!!

---

## जीवन म्हणजे !—

—0—

[ जातिः— मुक्तछंद ]

१.

तलम रेशमी विकच्छ पातळ
बिनबाह्यांचा लांडा ' ब्लाउझ '
ओष्ठ–शलाका × फिरविशि ओठीं
शीतशर + फासशी मुखाशीं
नेत्ररंजकहि दिसतें नेत्रीं
कुंतलसुधा केशास लावुनी
गुलाबजल शिंपिशी त्यावरी
आणि खोविशी कशि हौसेनें
वेणीवरती ' गोल्डनग्लीम ' ! ÷

२

नाजुक छत्री डोईवरतीं
चामचंचिची करांत माळा

---

× ' लिपस्टिक '  + ' स्नो '  ÷ गुलाब पुष्प

केसाळ ' पपी ' दुसऱ्या हातीं !
अवखळपणा तर आंगोपांगीं
स्वभाव वाटे, फटाक्यांतली कुणी तडतडी !!

३

नाझनखरा तुझा पाहुनी
कुणास वाटे काय असावी
थिल्लर कोणी ' कॉलेज-कुमारी '
अभिनेत्री वा रौप्यपटांतिल !

४.

नकली सौंदर्याच्या मागें लागुन
तुझेंच केलें प्रेमाराधन
कितीक वेळा नजरा भिडुनिहि
गालांवरच्या कळया-पाकळया
तुझ्या न खुलती !

५.

प्रसंग स्मरतो : एके दिवशीं
खोलीमाजी होती बसलिस
चोरपाउलीं शिरलों तेथें
आणिक म्हटलें गमतीनें :
" कुंदा जरि मी राकट तर तूं
होशिल कां ग माझी हरळी ?
मी जर असलों धृपदधुमार
होशिल कां तूं सखे ! कवाली ?
किंवा झालों मी जर गांजा
होशिल कां तूं माझी भांग ? "
—अन् दिधली टिचकी तव गालावर !

किंचाळलसि तूं कर्कशस्वरें
चार लोक जमले दारापुढें
आणि पुढच्या भयानक प्रसंगाचे
" हाय ! तें नकोच स्मरण ! "

६.

दुरावलों कायमचें आपण
समता जगतीं साधायाला
वाहियलें मी अपुलें जीवित
आयुष्यावर मागिल पडला
अखेरचा जणुं वाटे ' ड्रॉप ' !

७.

वर्षांमागुन वर्षें गेलीं
कोंपऱ्यामधीं निवांत बसुनी
मजुरांचा सोडवीत होतों प्रश्न
—तों दारांत तुझी मूर्ति
शालीनतेची जणुं आकृति !
चंचलतेचें झालें होतें
संयमितपणांत परिवर्तन
तनू तुझी तई मला भासली
प्रकाशोद्गारी लताच सुंदर
" यौवनाच्या पहिलेपणीं
होती मानव इष्कातच मश्गुल
' बनोत* विषयाचे किडे
आपण करूं ध्येयरसपान '

* Bee.

जीवन ह्मणजे गमली गंमत
आतां कळलें जीवन ह्मणजे
जबाबदारी ! —
समरभूमी केवळ !! ”
झालें अपुलें ऐसें भाषण
ध्येयाच्या शुद्ध अशा पायावरती
उभारलें सत्प्रीती-मंदिर
पूर्वी गमलें जीवित माझें
निरर्थकच कीं जसा तराणा
आतां वाटे जीवित ह्मणजे
अर्थपूर्ण जणुं भावगीतिका !
तूळ रास तूं जणूं जाह्ली
आणिक मी शुक्र !
—जीमधें तो उच्चावरी विलसतो !
वाटे मजला झालों मी शिव
आणिक तूंहि माझी शक्ति !
कृत्तिकेची योगतारका
तीमाजी विश्वाचा जसा मध्यबिंदु
तुझ्या ह्रुदयीं तसेच केंद्रित
झालें माझें प्रीतिसर्वस्व !!



# राखणी

——0——

[ लावणी ]

आला जोसांत गहूं हरबरा
खेतांत फुले फुलनरा
आतां करूं मळणी ऽऽ — जी १
त्यो पल्याड दिसतो धुरा
झुळझूळ वाहतो झरा
प्रफुल्लित धरणी ऽऽ — जी २
शेतांत माल ये भरा
कीं गरीबास आसरा
म्हणुं जरा लावणी ऽऽ — जी ३
पिक अमाप येइल घरा
अन् तिचा फुलल चेहरा
चाल ग ! ह्यारिणी ऽऽ — जी ४
हांसून बोल ग ! तरी
घेईन तुजशि शेलरी
नविझार बैंगणी ऽऽ — जी ५
आंगांत गोड शिरशिरी
चाल ग ! माचव्यावरी
लागलें अतां झुरणी ऽऽ — जी ६
सलगिनं धरूं कोपरा
अन् ऊर लावुनी उरा
मौजेंत करूं राखणी ऽऽ — जी ७

# समतेच्या अंकावर

—0—

[ चालः— मज गमत गगन निकटिं ]

त्याच ठायिं चल चल गे ! रमत आज जाऊं
जीवनास या उदास अर्धचंद्र देऊं ! ॥ ध्रु० ॥

प्रीत दिव्य जेथ फुले
निश्रेयससार मिळे
स्वप्नतरल जीवनांत रमत रमत वाहूं १

जेथ कशाची न वाण
यौवनही हो न जीर्ण
क्षणक्षणास अभिनवता अखिल बघत घेऊं २

भाषण ह्मणजेच गान
आणि सुधा हेंच पान
दोघेही त्या प्रांतीं कर करांत गोवूं ३

राग नसे स्त्रीरागाविण
जीवित कीं तेंच कवन
गोड सूर ऐकुनियां हर्षमत्त होवूं ४

पायबंद जिथ न अडे
झांपड मनिं गोड पडे
उन्मनींत गुंगुन ऐशा सौख्यसत्व सेवूं ५

कीं गुलाब कांट्यावांचुन
त्याच ठायिं येइ दिसुन
कल्पवरी त्या ठायीं भ्रमत रमत राहूं ६

फत्तर ह्मणजेच फुलें
ऋतु वसंत मात्र खुले
एकरूपता दोघेही त्याच ठायिं पावूं ७
कसलाही नच कलंक
एक जिथें राव रंक
अंकावरि समतेच्या बसुन गीत गाऊं ८

---

# कां ?

—0—

[ चालः— कर दिया है जब हसितं ]

खंजिर तव नेत्राचे रोखियले अजवरि कां ?
अन् तसेच आवळले नखऱ्याचे जंजिर का ? ॥ ध्रु० ॥
आतुरता दाखविली पाडुनियां भुरळ अती
हावभाव दाखवुनि लावियला कां चटका ? १
मी झालों गझल तर तूं ठुमरी शोभलि ना ?
गालोंच्या वारुणिचा पाजियला कां घुटका ? २
लंपट मी बनुन गडे ! झालों आजवरी फंदी
झुलला गे ! तुजवरती आजवरी जीव फुका ३
देशील मला वाटतसे माणिक तव जीवींचे
आज परी तुजजवळी नाहींना मणि फुटका ? ४
एकतरि होतिस तूं षड्ज गडे ! मी तीचा
तट्कन परि तोडियला आशेचा कां तटका ? ५

---

# हंगामानंतर !—

—०—

[ चालः— 'आला खुषींत् समिंदर' सारखी ]

हंगामाला आला भर, आपल्या 'काळी' वर
दैन्य लागल आतां सरूं
ग ! सजणे, मनीं नग तूं झुरूं ॥ ध्रु० ॥
हिरवकंच ह्ये झाल शिवार
पिकपाण्यानं केली बहार !
तोंडावरी फेकूं तुकडा, चुकवुं सावकारांचा लकडा
ऋण देऊं न अगदीं उरूं १
झाले चढेल सावकार साहु
समृदि विस्टेट बघती खाऊं
मारवाड्यांचा भुंगा, दाऊनशान ढुंगा
लागे घरास तो पोंखरूं ! २
अक्कल हुशारिन गाहान
लिवुनशान देह्ल लहान
कर्ज वाढल जस तन, गेलं फोफाउन
मनिं चिंतेचा सले गोखरू ! ३
दारिं मांडुनी बसती ठाण
लचके तोडीति बनिये पठाण्
आमूची आईबहीण काढुन, शिव्याश्राप देउन
अब्रु बघती सारे हरूं ४
जसि आली जव्हा घरावर
औतभांड निघे बाहिर

तव्हां तुझ्या डोळ्यांतुन, अक्षी रात्रंदिन
अश्रु लागती किती पाझरूं ५
ताप मनाचा दुरावला क्षणीं
ह्मणुन हौसेन करूं पाखाळणी ×
आतां वस्त्र अंगभर, घालू समध्यावर
पिवळि शेवंतिलाही करूं !! ६

---

# चटक चमेली !!

— 0 —

[ चालः— चालला दिवस ह्यान् गाडी ]

करूं नको ग ! हुतराजी
फुलशेवंती ! हो राजी !! ॥ ध्रु० ॥

भर उमरीमधिं तुझिया देहीं लोटे नौतीपूर्
वाहत गेलों ह्मणुं नको तूं आतां मजला दूर्
छातीवरती हलती जोबन बघुनी त्यांचा झोंक्
मदनाचे कड मनांत उठुनी झुरती मरती लोक् !
नैनबार्चिची आवर आतां लसलसती सव धार् !
शीतळ गंगा वळव प्रीतिची ना तर झालों ठार् !
चटकचमेली ! तुला पाहुनी पडलों तुझिया अटकीं
ह्मणोत कोणी इष्कबाजि ही दुनियेवरती लटकी !!

× हंगामानंतरची शेतकऱ्याची मेजवानी.

डोळयावरती चढे तरावट आजच करूं लयलूट्
कोठुन आलों, कुठें चाललों कशास काथ्याकूट् ?

## माझी प्रभात

—o—

[ शा. वि. ]

ओष्ठीं आरुण दोन या, अरुणची सामावला सुंदर
पूर्वेची पसरे मनोहर छटा तांबूस, गालांवर
नेत्रांच्या कमलीं द्विरेफ बसले होऊनियां तल्लिन
वाणी—हीं खगकूजितें— करितसे माझें सदा रंजन

घर्माचे दंवबिंदु मौक्तिकमणी भालीं किती शोभती
वायूच्या मधुगंधि मंद लहरी श्वासासवे वाहती
पुष्पें हीं फुललीं बघूनि रदना ऐसें गमे मन्मनीं
सारी मंगलता तशी मधुरता थाटे तिच्या आननीं

माझ्या सन्निध ही उषा विलसतां स्नेहाळ नेत्रोत्सव
कां व्हावी मग उग्र या जगतिच्या माध्यान्हिची जाणिव ?

## दिल्‌भरा !

—o—

[ लावणी ]

दिल्‌भरा ! राजअंबिरा !! रूपसुंदरा !
दाउनी हूल दाउनी हूल
कशि बाइ पाडिली सहजच मजशी भूल ? ॥ ध्रु० ॥

रे ! सख्या, असुन मी गरति, ठेविली रती, तुजवरी अती
कशी गत करूं, कशी गत करूं ?
हें उतावेळ मन कुठवरि तरि आवरूं ? १

लाविला सहज मज लळा, कापिला गळा, लागल्या कळा
येइं तांतडी, येइं तांतडी
मी धीर धरूं कशि ऐनपणीं पळघडी ? २

लावण्यकळा मुसमुसे, चैन मज नसे, उदासच दिसे
रात्र अंधारि, रात्र अंधारी
नेत्रास नेत्रही लागति ना पळभरी ! ३

वेणींत खोउनी दवणा, लावुनी नयना, तुजकडे रमणा
पाहत्यें वाट, पाहत्यें वाट
काहूर मनामधिं उठलें पारे घनदाट ! ४

उमदा तूं दिससी बन्सि, तुझी मी हंसि, नार गुलाबासी
होउं दे मिळणि, होउं दे मिळणी
हो मयंक मीही होइन तव चंद्राणी ! ५

---

# तुझ्या सहवासीं !

—0—

[ जाति—कणिका ]

तो सागर खारट असे जरी भूवरी
सरिता मारी मिठी तया तत्करीं
ज्या ठायीं त्याचें मीलन होई तिथें
जल अर्धें खारट-गोड गडे ! राहते !

सहवास सखे ! तव लाभे मज प्रेमळ
हें पूर्वजन्मिचें भाग्यच गे ! केवळ
जीवितांत होती पुरती जरि रुक्षता
तरि गोडी अरधी आली तेथें अतां !

दुःख, कष्ट, पीडा उरलेला जाचजी
गोडवींत हीही जाती त्या लोपुनी ! !

---

# पांखवा !

——0——

[ भैरवी—त्रिताल ]

ये आतां हांसत मम पाखरा*
वळवि पाऊले हृदयेश्वरा ! ॥ ध्रु० ॥
कोण्या बनीं होतास रंगला ?
सहवास कुणासवे केला ?
भरती आलि रे ! सुखसागरा ! १
हातचा होतास सुटला राया
देवाजीलाच आली दया
म्हणुनियांच येशि कोटरा २
घालूं चोंचींत चोंच सुंदरा
मिसळुं अश्रूंत अश्रू जरा
श्वास मिळवूं श्वासिं प्रियकरा ३
देइं मोलाचा प्रीति-पांखवा
प्रेमरस चाखूं दे नवा
घे प्राणाचें मोल कोहिनुरा ! ४
ओढाळ तूं अचपळ अती
जाशिल पुन्हां कोणा संगती
तुझ्यावांचुन जिव घाबरा ५
होइल आपलि रे ! ताटातुटी
मग कोठच्या गांठीभेटी ?
पसरिल मार्गांत कोणि वागुरा ! ! ६

* ही पहिली ओळ माझी नाहीं.

# अंबरपट !

—0—

[ मुक्तछंद ]

विशाल, श्यामल अंबरपट !—
खंडोगणती कोटी सूर्यप्रभ
अग्निस्फुलिंग, गोल घुमटीं, तेज गाळिती !—
चपलचरण वीज कडाडे, मेघ गडाडे
उल्का करिती, फुंफाट फूत्कार
होती संपात, भयसूचक
भैरवाकार, ग्रहगोल तसे
देती हुंकार

सुरम्य, अद्‍भुत अनंत अपार
अति अघटित, तसे अगोचर !
विश्वसूत्रधार–कृति ही अगाध
दाविते तयाचा प्रताप प्रभाव
बलदर्पोद्धत, मदांध सैतान, गांगारून मन
नमविती मान !

अंतराल वाटे परात्पराचें
विराट मुखच !
अर्जुना दाविलें जें एककाळीं
दर्शनदु ्‌र तें रूप पाहतों
भुकेल्या नयनीं, यामवतीमाजी
आम्ही प्रतिदिन ! !

---

# वेडप्या, मधुकरा !—

—0—

[ छंद–जलकांत ]

( ओवीप्रमाणें )

गुलाब कळिकेला लोभून नको जाऊं
वेडप्या, मधुकरा ! धुंद तूं नको होऊं ! १

साध्वी ही मधुकरी रूपानं जरी उणी
जिव्हाळा हृदयींचा मनांत तिचा आणी २

सुशील स्नेहशील सतीस नको टाकूं
बेमान नागिणीस नको रे ! कवटाळूं !! ३

वरुनी कांतीमय सापाची जशी कात
कुटिल वंचक ती निराळी अंतरांत ! ४

शेंकडो तिजभोंती घालिती जरि पिंगा
लाभे न एकासही करिती व्यर्थ दंगा ५

एकास दावी स्मित दुजास गोड हंसे
लाघव तिसऱ्यास फासांत जो तो फसे ! ६

वरच्या देखाव्यास जाशी कां हुरळून
वरून जग दिसे आंतून तसें तें न ! ७

दिसतें तक्र शुभ्र वरून निरागस
नासतें मधु दुग्ध नेहमीं पाहतोस ८

चिमणी दिसतसे अहिंसामूर्ति जरी
मारूनी कीट खाते ध्यानांत कांहीं धरीं ९

सौंदर्य—सौदामिनी नांवाची चंद्रज्योती
गरल भरलेलं लतेच्या पहा स्वांतीं १०

वरून दिसे कडू तंबोरा-तुंबीफळ
आकर्षी काढुनीयां मनास स्वरजाल ११
लोंकर निघे मऊ गरवी*-गाभ्यांतून
पोटांत मंद्रिकेच्या ** फुलेल-सांठवण ! १२
गुलाबकळीमाजी राहतो मध गोड
शिरवी कोण तुझ्या डोक्यांत असें वेड ? १३
कल्पना कवीची ती तींत न ताळमेळ
उघड डोळे जरा जपून जगीं चाल १४
सोडून ऋजुमार्ग बाजूला नको सरूं
हातचें सोडूनीयां पळतें नको धरूं !! १५

---

## घालुं नकोस आतां अटी !—

—0—

[ लावणी ]

सखे ! वदन तव चांद
यौवनीं धुंद
चाल बेबंद, मखमाली—
नवनवती
लावण्यकांति घवघवती ऽऽ ग ! ॥ ध्रु० ॥
तनु राजस अति गोमटी ऽऽ—ग
ही नजर किती चोरटी ऽऽ--ग
हा हिरवा तिळ हनुवटीं ऽऽ—ग
ही मापुक किती कृश कटी ऽऽ—ग

* पोलाद ** डांबर

बाजुबंद बाहूवटीं ऽऽ—ग
नवचंद्रकळा पोपटी ऽऽ—ग
सुख माझें तुझिया मुठीं ऽऽ—ग
घालुं नकोस आतां अटी ऽऽ—ग

---

# तळतळाट !

—0—

[ छंद- ज्वालावती ]

लाज झाकण्याला नसे चिंधोटी
चालली त्यांची उपासमार ! १
कोटी दिसताती कारुण्यमूर्ती
विपन्नावस्थेंत दीन भारतीं ! २
सोडोनीयां सारी माणुसकीही
तयांना नाडिती लक्ष्मीचें गुलाम ! ३
मिरासदारही मिजासखोर
गांजलेल्यांवरी पाखडती आग ! ४
हंबरडा त्यांचा ऐकाया झाले
आमुचे अगदीं बधिर कर्ण ! ५
चाललेलें त्यांचें दलित—दैन्य
नसती आम्हांला पहाण्या नेत्र ! ६

निढळाचा घाम त्यांनीं गाळावा
अर्थमात्र सारा गिळावा आम्हीं ! ७
एक गोणपाट सुंभाची खाट
नशिबीं केवळ कावाडकष्ट !!! ८

---

# बहार !

—0—

[ जैजैवंती--त्रिताल ]

साजणी ! उडवूं बहार् ॥ ध्रु० ॥
नादर नवली तुझी फांकडी
मदनजुई तव जणुं शेलाटी
सहजीं साधिती शिकार् १
मतवाली तूं नार रशेली
केळफुलें तव मलपति वक्षीं
गालिं हे खुलती अनार् २
सुरत मुलायम तुझी सहेली !
जालिम नखरा तुझा नागिणी
तोडिशी कालिजाहि पार् ! ३
कमानवाले काडिक डोळे
हिलूखुलास तव मोहक चाले !
—झुलुन सखये ! करुं ये विहार् ! ४

---

# अकारण !--

—0—

[ मुक्तछंद ]

१.

चालला होता उत्सव भारी कोठें
अहमहमिका, वाहायाची फुलें, होती लागली
देव्हाऱ्यांतील, दगडाच्या माथीं तेथें !
टपोर फुलांची, आणिक पत्रीची, झाली पखरण
येई कुणी व्यक्ति, भक्तिभावनेनें उचलूनी पुष्प, एक
मुकाट वांकून, केला नमस्कार, भाग्यवानास;
आणि अकारण, मिळविलें पुष्प, पुष्प--ढिगाऱ्यास !!

२.

दुज्या बाजूस, कोणी फेंकित, अभाग्यावरती धोंडे
कासावीस होई, प्राण त्या फुलाचा, कोणी नच देती, लक्ष
दगडाची झाली, डोईवर त्याच्या रास !
एक व्यक्ति आली, तिनेंही घेतला, करामाजी धोंडा
दावून मनाचा, अति तिरस्कार
आणि अकारण, हाणला त्यावर, कठिण फत्तर
दगडराशीस, एक मिळविला, आणखी दगड !!

# तुणतुणें !

—0—

[ जाति -मुद्रिका ]

गाजल्या तुताऱ्या, शिंग आणखी बिनें
त्या तिथेंच सजलों मीही छेडण्यास मम तुणतुणें ! १

झळकतात नंदादीप भव्य ज्या स्थळीं
मिणमिणती पणती तेथें ही भिकार मीं लाविली ! २

प्रासाद उभाविले जिथें दीर्घ दालनें
तेथेंच बांधिलें माझें खोपट मीं अगदीं सुने ! ३

माणिके हिरे भांडार कुणा उघळिले
धन दमडीचें माझें, मीं तुझ्या पदीं ठेविलें ४

चंडोल हंस जिथ भरारले अंबरीं
बदकासम फडफड केली केवळ मीं भूमीवरी ५

स्वरसुधा ओतिती जिथें अमित कोकिळा
दर्दुरासारखा तेथें काढियला कर्कश गळा ६

गगनचुंबि जेथें देवदार शोभले
रोपटेंच खुरटें तेथें आरीचे मीं लाविलें ! ७

कुणि पवित्र गाई तुला ऋचा संहिता
अर्थहीन बालिश केली बाष्कळ मीं वाचाळता ! ८

जाण्यास देवदूतही जिथें बिचकती
निःशंक दिलें पद तेथें ! अप्रबुद्ध मी दुर्मती !! ९

## Original poems



## Translations



## Prose Poem

# Foreword.

—0—

It gives me a very great pleasure in writing these lines to introduce the following few poems by Mr. N. N. Hood.

Inspite of the examples of Sarojini Naidu, Toru Dutt, Harindranath Chattopadhyay and others, the case of the Indian poets writing in English verse is not yet proved. The practice of Dr. Rabindranath Tagore ( really speaking ) goes against them. Rabi Babu first writes his poems in his own language ( Bengalee ) and then translates them, or gets them translated into English.

Even after a spell of successful writing in English verse, most of our countrymen come to the conclusion that it is useless to expect to beat the English poets with their own weapons.

This should not discourage those writers, who have a gift for writing in English verse – as Mr. Hood certainly has. They have before them a field which is almost untouched and unexplored. In fact, Mr. Hood has almost instinctively done, the very thing we would like him to do.

We feel that the best use which can be made of English verse by our countrymen, would be to intro-

duce the best specimens of poetry in modern Indian languages to the wider field of readers in other provinces, by clothing them in English verse. Mr. Hood has translated five very good Marathi poems in fluent English verse. This is a step in the right direction.

We look towards a day when we may have an anthology of the specimens or Modern Indian poetry in various languages ( like Marathi, Gujrathi, Hindi, Kannada, Tamil, Telugu, Urdu etc. ) in English verse. The book might fitly be called "**The Golden Treasury of Indian Poetry.**" If such a day ever dawns, we hope Mr. Hood will make a valuable contribution to the Section dealing with Modern Marathi Poetry.

B. M. Gore,
Professor of English
Fergusson College, Poona.

15-3-1941

# An Import.

—0—

This little booklet might come as a great surprise in this age, when almost all the finer brains amongst humanity talk disparagingly of poetry and the poetic impulse seems to be on the verge of extinction, through sheer – over exertion and exhaustion.

Mr. Hood is a Marathi poet of considerable merit and his entrance in the decadent domain of English verse must be hailed as an admirable effort to throw to the winds of publicity, the finer workings of his heart. I hope that the English knowing Indian public will find moments of delight in reading his verses— although I am conscious that the hair-brained aristocratic literary intelligentsia might hesitate to appreciate his poetic endeavour.

The better part of Mr. Hood's work appears to me to be his translations of marathi poems of the poet Waman Narayan Deshpande. The translations are admirably and happily done and convey the very spirit and atmosphere of the original as best as possible.

I hope that Mr. Hood's maiden effort will receive the chivalrous courtesy at the hands of the knights of literature and that his enthusiasm will meet with encouragement from the reader of his poetry.

B. R. Deshpande

M. A. L L. B.

Professor of English
Hislop College, Nagpur.

28-2-1941

1.

# To the Moon

——0——

Thou hast shone with all thy splendour
The world stood agape with eyes of wonder !
" 'Tis an angel divine ! " all they cried
" Muse of love ? " — " Nay bashful bride ! "
" In the lake of heaven 'tis a lotus blooming ! "
" 'Tis the bowl of nectar slowly oozing ! ! "
Thou fooled the people and them enchanted
Till anthems were heaped and hymns were chanted !!

Star-gazers with telescopes searched they face
And found thee made of rocks–heartless !
Once the subject of peans of praise
Now thee to scorn will the world debese !
My heart in agony bleeds to think
—Beneath the Beauty should Ugliness blink ! ! !

# 2.

# To Him*

—0—

Far in the reamls of Devotion did I roam
On the wings of Meditation leaving home
Glimpses of thyself few and far between
With mind's eye then I had gladly seen
Only to thy temple-threshold could I reach
( Which was built on a shifting sandy beach )
Deeper down the adytum Thy image was set
Impressions vague as mist I could get.

" Thou art an airy nothing ! " I did exclaim
My weakened faith at last weaker became !
Why not in human shape should Thou me meet ?
Best-beloved by men and divinely sweet ?
Come Oh ! face to face, that I Thee may feel
Till then I stand here confused still ! ! !

---

* A transfiguration of " Vicalpache Dhuke " page 8 ( Marathi section. )

# 3.

# Two Lovers

— 0 —

Against a twisted creeper she did lean
As if some lady of no beauty mean
There she sat with her face half serene
In her royal robe : proud as a stateley queen ! !
Came a bee : was locked in her bosom warm
It was a meeting of infinite charm !
He left her lonely a moment later
Away he flew to seek some beauty better ! !

A candle was burning with a flickering flame
A gay coloured moth rushing in came
Singing her praises he around her hovered
Many a glance of love on her he showered
Her flaming lips he for a moment kissed
And dying, made immortal, the love he missed ! ! !

# 4.

## A Cup of Bliss !-

—0—

Under the star-lit sky as I did sit
A wonderful landscape my eyes did meet
With reeling music, a babbling brook did flow
The playful breezes fanned my cheeks, then slow
Sweet memories and pleasures of life were seen
Fleeting before my eyes, as on the silver screen !
All wrapt in a reverie, I mused there amazed
As if a cup of bliss, to my lips was raised ! !

Somebody whispered in my ears, just then
Like an imp, who delights in another's pain
" Brief is the life, and briefer still the charm ! — "
Deep in the heart, the thought pricked as a thorn !
The cup of bliss fell from my hand
And to the dust was dashed all the dream—land !!!

---

*

# 5.

## Departure

—0—

( A Sonnet )

Down came the signal and the whistling train
Began to creep on slowly; and bereft
My heart for a moment stopped, and then a pain
Shot through and through my body— thus you left.

Thy tear-dimmed eyes and fluttering kerchief passed
Beyond my ken. A cloud of darkness spreads—
Lonely I wake and lonely have I tossed
On bed. My mind the future dreads !

Art thou gone but for a while ?— a thought does fill
Ghost like my mind, and raises its ugly head,
Overpowers me and my spirit does chill
Saying " gone for ever gone ! " May Angels defend !

Friends were we, in company; but now,
Apart: my heart for you does love a vow...

# 6.

## Emotion*

—0—

Delicate was her frame and limbs well-knit
Frank were her eyes and lips were sweet
Soft were her hair, and streaming back
Delicate were wings, in nothing did she lack !
She seemed to; be made of light and air
Nothing in the world was so fine and fair
Shedding the bliss and all over mirth
'Twas **Emotion** that moved all o'er the Earth.

Gaunt and grave figure, then there came
Massive was he and "**Business**" his name
Her heart within her, shrank then chill
A cry of dismay she gave out shrill
Towards her made he soon his way
And at last alas ! she became his pray ! !

* A transfiguration of one of my marathi poems "भावना"

# 7.

# To the kite

---

See how ascended in heaven the kite
It has taken now the loftiest flight
Against the horizon and high above
One black speck is seen but now !
In the limitless ocean or sky just see
The ship is moving wanton free
The string was lost from the boy's grip
Down came the kite with a whirling dip.

Thou hast triumphantly once fluttered
Above everything else in the world
The eye of heaven greeted thee then
With wondrous eyes looked women and men
It's better to rise though one may fall
Than never to rise like a stone at all.

---

# 8.

# Mute Appeal

—o—

Now and again I thought of Thee
In supplication I fell on my knee
Yet never chanced to see Thy trace
When wilt Thou show Thy actual grace ?

Single-hearted I came at last to Thee
In mute appeal, yet Thou heeded not me
Thou ramained to us all, unrevealed
In an illusion, a thing of beauty sealed !

Even Thine glimpse held me spell-bound
As does the sweet and far-off sound
At Thine glory I stood all dumb found
And my eyes sank dizzily to the ground

Thy golden orb did fade from sight
And left me all to darkness and fright ! !

# Towards the the fairy land *

I

Boy:— Take me Oh Path !—
To the Fairy land, where they say—
That brighter than moonlight itself
The city has put—
Its resplendent glory on ! !
Sweet laughter and music melodious
That of fairies alone there reign
And " wherefrom " they say—
" Heaven is near—
And paradise stands but a little yon ! "

2

Take me Oh, Path ! —
To the Fairy land
Where, in abundance divine shrubs grow
Where, the dark Death shuns to lay its icy hand
Nor an old Age makes sick the heart
No glimpse of grief is found
But eternal Youth with eternal Joy
Breathes thro' the realm of Neverland !

---

* A transfiguration of the poem " Paryanchi Nagari " from the collection 'Aradhana' by Mr. W. N. Deshpande.

3

Yet ere an Adult or Bowed with age
Makes his footstep there
The gay company of the Children of air—
Quickly depart for ever !!!
Their sweet songs with their ringing laughter die
And the vision-world in nothingness dissolves.

4

But to an Infant in sinless innocence
They with all their hearts do greet :
And with their visible forms
Pour out their softest strains evermore still !!!

5

Wonderful tales, Oh ! wonderful tales—
I do hear about the fairy land
I with curiosity burn
And long to see what it is beyond !
Take forth O path, O take me forth
Amid that wonder-land !!

6

Path:- How can I Oh, Boy take you there ?
As I myself am made of worldly stuff ?
To worldly city house or bazar
To escort you I am ready here !
But to take you to the city of charm
That power dwelled in me never never !

7

To see that world if you desirous be,
And to attain that perpetual Prime

To enjoy that laughter, mirth and bliss perennial
To avoid cold Death and that Age gray
You to me Ah ! profitless come !!!
I am the material Way of the material world
Rest on me — this UNSUBTLETY—
And forever Oh, boy ! —
Forget the city of Wonder ! ! !

---

## " The Song of Fairies+ "

I

Ere the midnight enfolds the earthly sphere
In its dark disguise
From our lonely nook of paradise
We take to wings :
And in that quiet hour
Steal over the Earthward way !

2

The flickering beams of our tiny way-lamps
Fitfully dance
Against the darkest space
" The glow of the fire-fly " They them call
At this stupidity we are amused all.

3

From our dark soft hair
There emerges ever

+ A transfiguration of the poem " Paryanche Gane " from the Collection ' Aradhana ' by Mr. W. N. Deshpande.

An enamourating scent
The wistful wind takes its fragrance
From place to place
Far in the heaven and in the earth
The Humanity thinks :
" A garden has blossomed somewhere near "
We laugh to see this wisdom rare.

4

Here one engrossed in playing a lute
There the other, in music melodious
We mingle our soft tunes in them, unseen
And hence the flowing strain
Far sings sweeter still
Sending one's heart to thrills ! !
They praise their authors vain
At this silliness we are amused again ! !

5

One who is lulled to deep repose
In his calm and resting place
We whisper in his ear
The magic message of love
Then he sees something strangely sweet
Which they call ' A pleasant dream '
And again the mirth for that
On our faces gleams ! !

# Towards the Rock of Ruin*

Shattering the heavenly peace of the earth
Killing the whole world's glee and mirth
Indifferent to all happiness and woes
Onward and onward this cataract of life flows.

From the mountains craggy it plunges giving a wail
Into the depths below that terrific dale
Howling storms do whip the fury of nature
At the fearful sight trembles every creature.

Like as a demon big, it opens jaws of tossing foam
Taking all things in its clutches wildly roam;
By the rays of sun it looks bright and shine
But hurls the universe to the rock of ruin.

Desperate and piercing wailings of Poverty
Praises of Aspiration, Triumph and Vanity
Sweet tunes of the brooklet merrily gigling
And sweeter far than that the damsel's singing...

Soft laughter of womanhood; birds fine caroling
Lotus-eater's and lover's boisterous paroling

Realise O, helpless man this painful fact
All are drowned, in the dreadful cataract.

Wrecks of Virtues, Prime, Hope, and kingly Powers
Grace, Delight, Kisses, blushes, and fragrant flowers
All are drifting onward and remain no more
Too soon, too soon alas ! their life is over.

It's destined to fleet, on and on, catching in the net
All its victims, surely to the fearful rock of Fate
It needs be dashed and split in thousands-nay
Lakhs of molecules and at last meet its doomsday.

It's afflicting noise is ringing in my ear
How heartlessly, it separates the beloved from the dear
Even the Heaven has little might left in Him
To avert the fate to which the cataracts skim.

---

* A transfiguration of one of my poems "Jivit prapat"

# Kakmari *

## ( A Prose-Poem )

He peered round. His eyes rested upon an inviting landscape which they had never met before. In plentiful growth scattered mango-trees, crested with delicate sprouts. Yonder extended a plateau pleasant with blue and white Gokarn flowers. Sombre rocks presented themselves in sharp contrast with their summits ablazed with the golden shafts of the morning sun.

Out from the emerging brooklet swelled a strain of sweet melodies which a bower maiden by its side, was listening intently. The breezes rejoined with it a note from nature in happy harmony, except discordant sounds at intervals.

In the midst of green bower, clad in purple costume, there stood lo! on the pedestal of heaped flowers, the queen of creepers, the pride of the place **Kakmari** in all her stately form. She was graciously tender, as she was singularly beautiful! A ray flashed rightly on her face, and her pretty eyes glittered in it as the diamonds of first water! Sweet perfume of "Bhuichampak" floated upon the air to please her vanity, "Veriliflora" + served as a soft cushion for

. . . . . . . . . . . . . . . . .

+ One of the creepers in Konkan.

her to recline, and luxurient foliage formed canopies rich, of her banqueting chamber.

Nearer and nearer the crow came till at last he could faintly perceivs the object of it's love. Never in his wildest dreams had he beheld such a beauty rare—a face half so fascinating.

He mused for a moment and then murmured : "Can she be blended with me ?" "Equally as ugliness can meet with Elegance, oh, you blind fool !" Cried the bower maiden. "He seems to be one of the pack of those idiots, who paid the price of their precious lives for that alluaring love—affairs" sneered Discria Alata. ×

"Dispel this idea from your mind ere you earn death by your rashness; or do you want to repeat the same sad story of that mad moth ?" questioned the whole forest with myriads of tongues.

"Deus Avertat" + screamed the birds, "Think the danger that awaits thee, and added in a subdued voice "she is **Kakmari;** Poison is her heart and fatal is her beauty. Don't you know her venomous love has sent many a young fool to his early doom ?"

The rippling waves of the revulet echoed the same song of caution. He seemed for a moment shrouded in deep trance and then ejaculated "Dum spiro spero" ÷ "The sneers of her tempting beauty are

---

× One of the creepers in Konkan.

\+ God save this fool.

÷ While I breathe I hope.

already upon me; what matters if I sacrifice everything for the love eternal that is glowing fast in me ? Cost what it may I must stake it for the mere thrill of ecstacy that love brings in it's train. "

Frantically he darted forward overpowered by her captivating beauty and found himself face to face with her. He stood amazed gazing, and his eyes dazed with the radiance of her glorious face and form. Her charming smile held him rooted to the spot !

He flung himself at her feet and solicited " Oh ! fairest of all, you are the deity of my heart— The idol of my love. Let me quaff off the nectar that flows from your lips and then— and then "—— He faltered. She shuddered at the shrill voice that came from him as from a broken flute.

" How thou darest affront the queen herself ? The black and dirt-eater I hate downright; I disdain all your flatteries " said she indignantly. The metalic ring of her sound died away in silence and a poignant pang of agony shot through his whole being !

" Oh ! exquisite one dispise me not ! Can't you imagine the distress that lies deep in my heart ? It's yearning for you from the moment since it chanced to see you. Take pity on me— Taked pity on me— " he sobbed.

" Woe to thee loathsome creature, " she went on mockingly " Even suitors like Bulbul and chandol found not more ceremonial treatment than thee. "

" Earthly is not the love that dwelleth in me. I cherish love immortal. None but you I adore.

Wretched that I am, I beseech you to shower one benevolent look upon me to sooth my aching mind." He urged only to be rejected again! "That life is an impossibility without you is necked truth", he muttered with a swelling heart and an appealing look; yet she remained colder than ever !!

All hope in him was now reduced to ashes. He became exasperated. His eyes flickered. He rose. His whole face flushed crimson with the idea of coming triumph of embracing his beloved. Keen delight mantled his cheeks. Outstretching his hands, he rushed towards her, but the moment he locked her greedily in his arms, it seemd that all light went dark before him. His dreadful shrieks rang throughout the wilderness of the forest, and he fell on the ground stark dead ! !

---

* The information on which the story is based:— The creeper KAKMARI is found in Konkan. It is poisonous. Its fruit are of purple colour. Crows attracted by its fruit go tc eat them and die of the poison of the creeper.

## श्री. वि. स. खांडेकर यांचा अभिप्राय.

**मराठी साहित्याच्या काव्यक्षेत्रांत सध्यां हिरवळीचीच विपुलता आहे. मधून मधून बिनवासाच्या फुलांनीं डंवरलेल्या कांहीं वेलीही दिसतात हें खरें; पण पारिजात किंवा बकुळ यांचा आढळ मात्र क्वचित्च होतो. त्यामुळें श्री. हूड यांच्या कविता वाचून मला आनंद झाला.**

' पराग ' या काव्यसंग्रहांत काव्यदृष्टि व विनोदबुद्धि, राष्ट्रभक्ति व शृंगारप्रियता इत्यादि विरोधी जोड्या हातांत हात घालून विहार करित आहेत; त्यामुळें श्री. हूड यांच्या कवितांतलें वैचित्र्य आकर्षक वाटतें. अत्र्यांच्या ' झेंडूच्या फुलां ' पासून मराठींत विनोदी व विडम्बन कवितांचें पीक फोंफावलें असलें तरी वकीली व्यवसायावर शरसन्धान करण्याचें श्रेय श्री. हूड यांनाच द्यावें लागेल. ' पादत्राण व पोबारा ' ' युक्ति पण युक्ति ' ' बा पक्षकारा ' इत्यादि मधील वकीलांचे नमुने चित्रित करण्यांत कवीनीं चांगलेंच चातुर्य दाखविलें आहे.

' अरधेंच ठेव तव गीत ' ' प्रणयगुज ' ' कधीं ' ' अम्बरपट ' ' अकारण ' इत्यादि कवितांत कवीचे आतमीय गुण सुन्दर रीतीनें प्रकट झाले आहेत.

**इंग्रजी काव्यलेखन हाही श्री. हूड यांच्या कवित्वाचा चमकदार पैलू आहे !**

मात्र त्यांच्या सर्व गुणांचा उत्कट विलास पहावयाचा असेल तर तो ' काव्यसंन्यास ' या नाट्यकाव्यांतच आढळेल. मानधन गुणाढ्य दरबारांतून

निघून जाण्यापूर्वी जें भाषण करतो, त्याच्यांतली उपमा किती समर्पक आणि परिणामकारक आहे पहाः —

' कसोटी नको रे ! सौम्यतेची पाहूं
आमुची शान्तता कर्पूरासमान
शीतल जोंवरी नच अग्निस्पर्श
तेजोभंगाचा न लावी अग्निकण ! '

पृष्ठ ६६ वरले--

' अकूवरतीच कित्येक कीटक
जगती जीवन
म्हणून कवीही होतात निर्माण
काव्याचे चटोर
आणि बनताती प्रवाहपतित ! '

हे उद्गार गुणाढ्याच्या काळाइतकेच १९४१ सालींही खरे आहेत. नाहीं कां ?

श्री. हूड यांच्या या संग्रहाचें सर्व रसिक निःसंशय स्वागत करतील.

कोल्हापूर
ता. १-८-४१

वि. स. खांडेकर.

# प्रो. श्री. ना. बनहट्टी यांचा अभिप्राय.

श्री

कांग्रेस नगर, नागपूर

ता. २३-७-४१

श्री. ना. ना. हूड, यांसी—

गेले तीन.चार दिवस मी आपल्या कवितेचें वाचन करीत आहे. मनाला गुंगविण्याचें सामर्थ्य तिजमध्यें बऱ्याच अंशीं आहे हें मी आनंदानें मान्य करतों. आपल्या कवितेंत जी एक प्रकारची खेळकरपणाची वृत्ति प्रकट झाली आहे, ती मला विशेष हृद्य वाटते. 'जीवन म्हणजे–' 'पादत्राण व पोबारा' '???!!??' 'बा पक्षकारा!' 'एक दुःखपर्यवसायी कथा' इत्यादि विनोदपर काव्यांमध्यें ज्याप्रमाणें ती व्यक्त होते त्याप्रमाणेंच 'राग कीं अनुराग' 'अरधेंच ठेव तव गीत' 'आकर्षण' 'राखणी' इत्यादि प्रणयपर गीतांतही ती दिसून येते. श्री. बापूजींनी ह्मटल्याप्रमाणें आपल्या कल्पनेंत नवनिता व भाषेंत कोमलता खास आहे. 'पाठशिवण' ही कविता आपल्या अभिनव कल्पनेचाच एक विलास आहे व तो माझ्या मतें फार मनोरम वठला आहे! या कवितेंत आपण आपलें ज्योतिषाचें ज्ञान चांगलेंच कारणीं लावलेलें दिसतें. आपण आपल्या वर्णनांतील उपमादृष्टांतादिक माल-मसाला कोठे खगोलसृष्टींतून, कोठे संगीतांतून घेता, त्यामुळें आपलें त्या त्या विषयाचें ज्ञान तर व्यक्त होतेंच, परंतु त्यामुळें आपल्या वर्णनासही एक-प्रकारची चारुता येते. परंतु उपमादृष्टांतादिकांचो यापेक्षाहि मुबलक सामग्री आपण वनस्पतीसृष्टींतून आणलेली दिसते!

आणखी उल्लेखनीय विशेष म्हणजे कित्येक कवितांतून व्यक्त होणारी आपली भक्तिप्रवण मनोवृत्ति. 'मूकस्तव' 'इषारा' 'नको करूं अनुग्रह' 'विकल्पाचे धुकें' इत्यादि कवितांतून व्यक्त होऊं पहाणारी आपली भावना खरी मनापासूनची आहे!

आपल्या काव्यांत व्यक्त होणारी आपली चतुरस्रता कौतुकास्पद वाटते ! ‘ दिल्‌भरा ! ’ यासारख्या अवखळ प्रणयाने ओथंबलेल्या लावणींत आपल्या रचनेचें जें माधुर्य प्रतीत होतें तेंच ‘ काव्यसंन्यास ’ यासारख्या करुणास्पद गांभीर्यानें भरलेल्या भारदस्त नाट्यकाव्यांतही होतें !…… हें नाट्यकाव्य चांगलेंच उतरलें आहे यांत संदेह नाहीं !

आपल्या काव्यासंबंधीं जे चार विचार सुचले ते येथे नमूद केलेले आहेत. आपल्याला ते स्वीकार्य वाटल्यास मला आनंद होईल. कळावें हें विनंती.

आपला,

**श्री. ना. बनहट्टी.**

---

## श्री० यशवंत खुशाल देशपांडे

एम्. ए. एल् एल्. बी.

### यांचा अभिप्राय

श्री. बापूसाहेब हूड यांच्या काव्यांत कल्पनेचें वैभव व भावनांचा जिव्हाळा यांचा हृदयंगम संगम झालेला दिसतो. 'वेडप्या, मधुकरा!' 'दिव्य किमया' 'To the moon' 'Two lovers' इत्यादि कविता याची साक्ष देतील.

'देहपात' इ. कवितांत त्यांची काव्यरमणी करुणरसाचे सूर आळवीत बसली आहे, तर 'आकर्षण' इत्यादींत तिच्या प्रणयाचा रम्य पदन्यास चाललेला आहे. 'तळतळाट' इ. कवितांतून विपन्नावस्थेंतील दलितांचें दैन्य वेशीवर मांडीत आहे, तर 'A cup of bliss' 'मगर मिठी' इ. मध्यें जीवात्म्याची असहायता व क्षरता त्याच्या ध्यानांत आणून देण्यांत ती मग्न झाली आहे!

'काव्यसंन्यास' या नावीन्यपूर्ण प्रदीर्घ नाट्यकाव्यांत, सत्काव्या-विषयीं सुद्धां सर्वसाधारण लोकांच्या कल्पना किती चमत्कारिक असतात;

'काव्य कशाचें खुशालचंदा?
—उरला नच कां तुजला धंदा'

(—नृशंस महाकवि गुणाढ्यास म्हणतो पान ५४)

त्या त्या काळांत श्रेष्ठ कवीविषयींही बहुजनसमाजांत कसा अनादर वसत असतो; वीणादासासारखे काव्यमर्मज्ञ विरळा, पण नृशंसासारखे गाजरपारखी अरसिक कसे बहुसंख्य असतात; कवि खद्योतासारखे बेगडी कवी व काव्य न वाचतांच त्यावर बरेवाईट ताशेरे झोडणारे सुदामासारखे बेजबाबदार टीकाकार कसे मोठ्या प्रमाणांत आढळतात; केवळ व्यावहारिकतेला बळी

पडल्यामुळें सद्भावनांचा व कलेचा कसा कोंडमारा होतो यांबरोबरच काव्याचें मानवी जीवनांतील महत्व, त्याचें ध्येय व स्वरूप इत्यादि प्रश्नांचेंहि दिग्दर्शन मोठ्या कलात्मकतेनें केलेलें आहे.

यवतमाळ

यशवंत खुशाल देशपांडे

३-८-१९४१.

# शुद्धिपत्र.

( पुढें महत्वाच्या अशाच स्थळांचें शुद्धिपत्र दिलें आहे. उडालेले, जास्त वा चुकीचे पडलेले अनुस्वार, इकार, उकार, काना, मात्रा अक्षरें, विरामचिन्हें इत्यादि वाचकांच्या सहज लक्षांत येतील. )

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ८ | जाति | छंद |
| २ | १५ | मीठी | मिठी |
| ५ | १ | जाहल | जाहलें |
| ७ | ८ | होणार कधीं | होणार हो कधीं |
| ८ | मथळ्याखालीं | जाति | छंद |
| ११ | २ | मुक्तच्छंद | मुक्तछंद |
| १६ | ७ | शिघ्रक्षण | शीघ्रक्षण |
| २० | ५ | सृष्टीविलास | सृष्टिविलास |
| २५ | ११ | स्तिमित आपण | स्तिमित तदा आपण |
| ३१ | ९ | कुरून | कुरून |
| ३४ | ११ | दास्यत्व | दासत्व |
| ३७ | २ | जनती | जननी |
| ३८ | १३ | राष्ट्र-भक्ति अणु | राष्ट्रभक्ति-अणु |
| ३९ | ९ | वकील | वकिल |
| ४० | १७ | | प्रथम चरणांतील बद्ध ती हे शद्ब दुसऱ्या चरणास जोडून वाचावे. |
| ४८ | ४ | अभ्रखंड | अभ्रखंडें |

काव्यसंन्यास या नाट्यकाव्यांत असलेल्या ओळींचे नंबर पहावेत.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५५ | ९६ | रत्नकळिसेम | रत्नकीळेसम |
| ५७ | १२२ | रजयंती | रंजयंती |
| ५८ | १४४ | पिश्याचो | पिशाच्ची |

| | | | |
|---|---|---|---|
| ६९ · | ३९१ | वत्वद्रष्ट्रा | तत्वद्रष्टा |
| ६९ | ३९६ | मिषातें | मिषानें |
| ७९ 'मूकस्तव' या मथळ्याखालील ओळ | | | |
| | | जाति | छंद |
| ८२ | ५ | वांधुनी | बांधुनी |
| ८३ | १५ | पिळवंदुनी | पिळवटुनी |
| ८५ | ८ | | जाति हा शद्ब नको. |
| ८६ | २२ | धृपदधुमार | धृपदधमार |
| ९४ | ६ | तांवूस | तांबूस |
| ९५ | १३ | गुलाबासी | गुलबासी |

## English Section.

| Page | Line | Incorrect | Correct |
|---|---|---|---|
| 1 | 9 | they | thy |
| 1 | 12 | debese | debase |
| 8 | 7 | ramained | remained |
| 10 | 4 | depart | departs |
| 16 | 4 | perceivs | perceive |
| 16 | 8 | ugliness | Ugliness |
| 16 | 22 | his | their |
| 16 | 19 | thee | thee " |
| 16 | 26 | sneers | snares |
| 17 | 14 | He | he |
| 17 | 24 | taked | take |
| 17 | 23 | it | I |
| 17 | 27 | chandol | Chandol |
| 18 | 2 | sooth | soothe |
| 18 | 13 | went | go |
| 18 | 4 | necked | naked |

---

एकंदर पृष्ठें:—१६४.

Mr. Hood's

## FUTURE PUBLICATIONS

1.

### Dew-drops

A collection of English poems.

2.

### A lily-cup

English translations of the poems of some renouned Marathi poets, and the poems of the author himself.

3

### Triumphs of cupid

English drama.

4.

### Moon-beams

English short stories.

5.

### A bird on the wing.

Modern Marathi poets, novelists, dramatists.